# कांचनगडची मोहना



हें नाटक

## रा० रा० कृष्णाजी प्रभाकर खाडीलकर



'संगीत मानापमान,' 'संगीत विद्याहरण,' 'संगीत स्वयंवर,
'संगीत द्रौपदी,' 'संगीत मेनका,' 'त्रिदंडी संन्यास'
'सत्वपरीक्षा,' 'प्रेमध्वज,' 'भाऊबंदकी,'
'कीचकवध' 'सवाई माधवराव यांचा मृत्यु,'
'बायकांचें बंड,' इत्यादि नाटकांचे
कर्ते, यांनीं लिहिलें,
तें

रा. रा. शंकर नरहर जोशी यांनीं पुणें शहर सदाशिव पेठ
१०२६ येथें 'चित्रशाळा' छापखान्यांत
छापून प्रसिद्ध केलें.



( आवृत्ति सहावी. )

सन १९२४

किंमत बारा आणे.

हें नाटक

राᵒसाᵒ गणेश श्रीकृष्ण खापर्डे

बी. ए. एल्‌एल्‌ बी. हायकोर्ट वकील

प्रांत वऱ्हाड, यांस

त्यांच्या रसिकता, सहृदयता, मार्मिकता व

बहुश्रुतता, इत्यादि गुणांबद्दल

ग्रंथकर्त्यांनें

# अर्पण

केलें आहे.



# प्रस्तावना.



तालिकोट ' येथें इ० स० १५६५ सालीं विजयानगर व विजापूर यामध्ये भयंकर लढाई होऊन विजयानगरचा पूर्ण नाश झाल्यावर, सुमारें पंचवीसछतीस वर्षांनीं म्हणजे सोळावे शतकाचे अखेरीस या नाटकांतील कथाभाग घडून आला अशी कल्पना केली आहे.

ता० ८।९।१८९८ **ग्रंथकर्ता.**



# दुसरी आवृत्ति.

ह्या नाटकास ' कोल्हापूर, आट्यापाट्या-क्लब ' नें ७५ रुपये बक्षीस दिले असून, रंगभूमीचे सोईसाठीं या आवृत्तींत ' महाराष्ट्र नाटक मंडळी ' चे सूचनेवरून महत्त्वाचे फेरफार केले आहेत. ह्यासंबंधानें माझ्या कित्येक मित्रांनीं वेळोवेळीं ज्या सूचना केल्या त्यांबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

पुणें, ता० ३०।१।१९०६ **ग्रंथकर्ता.**



# तिसरी आवृत्ति.

ह्या आवृत्तींतील चित्रें ' महाराष्ट्र नाटक मंडळी ' च्या नटांच्या त्या त्या प्रसंगाच्या फोटोवरून तयार केलीं आहेत.

ता० १ मार्च १९१० **ग्रंथकर्ता.**



# कांचनगडची मोहना.



## अंक पहिला.



### प्रवेश पहिला.



**स्थळ**—कांचनगडावरील बाग.

[ मोहना व यमुना हार गुंफीत गुंफीत येतात. ]

**मोह०**:—गडे यमुने, तुझ्याप्रमाणें माझेंही लग्न मोऱ्यांच्याच वाड्यांत झालें. तुझ्या ध्यानांत ही गोष्ट आली नसेल; पण मी लहानपणापासून पाहतें आहें, जसें जसें आपलें माझें होत जातें तसेंच हुबेहूब तुझेंही होतें—मला त्या वाड्याचा लहानपणापासूनच तिटकारा होता, तुला आवडतो का तो ?

**यमु०**:—मला देखील त्या वाड्याचें भयच वाटतें. माझ्या मनानें आपलें खास घेतलें आहे, कीं त्या वाड्याचा माझ्या लग्नाला अपशकूनच झाला. आज लग्न होऊन तीन वर्षें होऊन गेलीं, सुख म्हणून कसें तें मला माहीत नाहीं मोहने, पांच वर्षें झालीं नाहींत, तुझीन् माझी गांठ पडून ?

**मोह०**:--शहाजी झाला त्या वेळीं कायती तुझी माझी गांठ ! आज पांच वर्षें मी कांहीं विजापूर पाहिलें देखील नाहीं; मग गांठ ग कशानें पडणार ?

**यमु०**:--मी आपली मनांत म्हणत होतें, प्रतापरावांना दरबाराला यावेंच लागेल, आणि मग तुझीन् माझी आयतीच गांठ पडेल. पण आज पांच वर्षांत प्रतापराव विजापुराकडे फिरकले देखील नाहींत; काय झालें बाई कोणाला ठाऊक! आतां आपल्या सुदैवानें त्या देवपूरच्या राजानें खंडणी द्यावयाचें नाकारिलें व वाटेंत कांचनगडाला पांच सहा दिवस मुक्काम व्हावयाचें ठरलें, म्हणून तुझीन् माझी गांठ तरी पडली. नाहीं तर आणखी किती वर्षें अशीच लोटलीं असतीं, कोण जाणे !

**मोह०**:—देवपूरच्या स्वारीवर हंबीरराव खानाबरोबर आले आहेत असें ऐकिलें, तेव्हां तुझीन् माझी गांठ पडेल म्हणून किती तरी आनंद झाला म्हणून सांगूं ! ( तिच्या हाराकडे पहात ) हें ग काय यमुने, भरभर हार गुंफण्याची तुझी लहानपणची संवय मोडलीशी दिसते !

**यमु०**:—असेंच आहे बाई ! माझ्या पूर्वींच्या सर्व संवयी मोडल्या ! मला आतां हार गुंफतां येत नाहींत, गाणीं म्हणतां येत नाहींत, कांहीं नाहीं; मला ह्यांत कशांत सुखच वाटत नाहीं !

**मोह०**:—असें कां बरें यमुने ? आतां तुला काय कमी आहे ? हंबीररावासारखा सरदार आज विजापूरदरबारांत दुसरा कोणी नाहीं, आणि त्याची बायको म्हणे दुःखी ! मी कशी ऐकेन पण !

**यमु०**:—तुला कसें खरें वाटेल ? राजाला वाटते सगळी प्रजा नेहमीं दूध-भातच खाते ! प्रतापरावांचें तुझ्यावर प्रेम आहे; तेव्हां मजसारख्या अभागीच्या दुःखाची काय कल्पना असणार ? लग्न झाल्यापासून आज तागाईत प्रेमाचा शब्द कसा तो मला माहीत नाहीं !

**मोह०**:—काय ? हंबीररावांचें तुझ्यावर प्रेम नाहीं ? तुला सवत–बिवत तर नाहीं ना ? विचारते, रागावूं नकोस हो.

**यमु०**:—रागावतें कशाला ? माझें भोक्तृत्व माझ्याबरोबर. सवत नाहीं नी बिवत नाहीं. तिकडे झालें तरी असेंच दुःखी बसायचें असतें ! कोणी तरी अवदसेनें त्यांच्यावर चेटूक केलें आहेसें मला वाटतें. तो मोऱ्यांचे वाड्यांतील पश्चिमेकडचा हिरवा महाल नाहीं का—

**मोह०**:—( उत्सुकतेनें ) काय त्या महालाचें ? हिरव्या महालाचें काय ?

**यमु०**:—त्या महालांत स्वारी एकटी जाऊन फिरत असते ! तेथें दुसऱ्या कोणालाही जाण्याची परवानगी नाहीं; मला सुद्धां नाहीं ! सांडलेली वस्तु हुडकावी कीं नाहीं, त्याप्रमाणें ह्या खोलींतून त्या खोलीत स्वारी एकसारखी येरझारा घालीत असते ! मेली मी दुःखात असतें तरी हरकत नव्हती, पण त्यांना तरी सुख असायचें होतें ! [ साचिंत बसते.

**मोह०**:—( स्वगत )—माझ्या लग्नाच्या आदले दिवशीं मला एकटीला गांठून त्याच हिरव्या महालांत हंबीररावांनीं माझी शेवटची मनधरणी केली होती—

**यमु०**:—लहानपणची तूं माझी मैत्रीण म्हणून तुला विचारतें; खरें सांग मोहने, कोणी अवदसेनें जादु–टोणा केला असावा असें नाहीं तुला वाटत ?

**मोह०:**—तो मोऱ्यांचा वाडा कीं नाहीं. भुताटकीनें भरलेला आहे हो! मीं सुद्धां त्या हिरव्या महालांत एकदां भ्यालें होतें; मला असा भास झाला,—अगबाई! हंबीरराव! ( दचकल्यासारखें करून ) होय तेच! तुला दिसत नाहींत? ते पहा लांब, आपल्याकडेच येत आहेत!

**यमु०:**—( पाहून ) होय गडे, होय. मला जलदी हार गुंफूं दे. स्वारी येई-तों हाराला कांहीं रूप तरी आलें पाहिजे.

**मोह०:**—( स्वगत ) हिरव्या महालांत मला एकटीला गांठलें त्या दिवशीं-सारखाच आजही हिरवाच पोषाख हंबीररावांनीं केला आहे! यमुना म्हणते त्याप्रमाणें हंबीररावांच्या मनास मोह पाडणारी अवदसा कोण, कोण, बरें? मोहना तर नसेल ना? ( भ्याल्यासारखें करून ) अगबाई, हे अगदींच जवळ येत चालले! त्यांना कसें चुकवूं? येथें मी एकटी! ( यमुनेकडे पाहून ) खरें, यमुना आहे येथें. मी अगदींच घाबरून गेलें होतें!—तिकडच्या कटाची बातमी विजापूरला समजली नसेल ना? ही मोहना या कारस्थानाचें कारण—जगदंबे, माझ्या कल्पना सर्व खोट्या ठरीव. ( हंबीरराव येतो. ) ( उघड ) अग यमुने, ते अगदीं जवळ आले ना!

**हंबी०:**—( स्वगत ) जें पाहिजे म्हणून इतका उद्योग, तेंच नशिबीं आलें आहे; पण जें नको तेंही पण त्याच्याबरोबरच आहे. लांबून मोहनेला तेव्हांच ओळखली म्हणून इकडे यावयास निघालों; पण आम्हीं होऊन आमच्या गळ्यांत बांधलेली धोंड मोहनेच्या शेजारीं आहे, हें मला कसें दिसलें नाहीं कोण जाणें! आतां इतक्या जवळ आल्यावर त्यांच्याशीं बोलल्याशिवाय जाणें गैरच. [ जवळ जातो.

**मोह०:**—यमुने, तूंच त्यांच्याशीं अगोदर बोल गडे, अशी एकाएकीं गांठ पडली, म्हणून मीं अगदीं गोंधळून गेलें आहें!

**हंबी०:**—प्रतापरावांशीं बराच वेळ राजकारस्थानासंबंधानें बोलत बसल्यानें माझें मस्तक अगदीं तापून गेलें होतें, म्हणून असाच बागेंत जरा हिंडत होतों. अनायासें आपल्या दर्शनाचा लाभ झाला. मैत्रिणीमैत्रिणींच्या गोड भाषणांत माझ्या येण्यानें व्यत्यय तर नाहीं ना आला?

**यमु०:**—गोड भाषण कसलें? स्वारी जवळ आलेली पाहून मोहनाबाईंनीं मला विचारावयास सांगितलें कीं, भाऊजींना वहिनींची गांठ घ्यावयाला काल-पासून वेळ नाहीं का मिळाला?

**हंबी०**:—राजकारस्थानामुळें फावलें नाहीं, त्याची माफी असावी.

**मोह०**:—पांचसहा दिवस मुक्काम आहे ना ?

**हंबी०**:—सात आठ दिवस निदान येथें रहावें लागेल, असा रंग दिसतो.–खरोखर पादशहाच्या खास बागेंतही असलीं सुंदर फुलझाडें मीं पाहिलीं नव्हतीं !

**यमु०**:—प्रतापरावांना सुवासिक फुलांची फार आवड आहे; तेव्हां या बागेस तर ते जीव का प्राण करितात—

**हंबी०**:—त्यांत मोहनाबाईची व्यवस्था ! मग नंदनवनाचा थाट येथें दिसावा हें रास्तच आहे. ( यमुनेकडे ) वा ! आपण हार गुंफण्यांत गुंतलेल्या दिसत आहां !

**मोह०**:—यमुनाबाईस येथें माळ्यांचें काम करण्यास लावलें त्याबद्दल रागबिग नाहीं ना आला !

**हंबी०**:—आपल्यासारख्या कुशल गुरूच्या हाताखालीं काम शिकण्याची संधि मिळाली, हें तिचें भाग्यच समजलें पाहिजे !

**मोह०**:—मी का त्याना हार गुंफावयाला शिकवणार ? गेंदबाज हार कसे गुंफावेत हें शिकण्याकरितां तर त्यांना येथें घेऊन आलें.

**हंबी०**:—असें असेल तर गुरूहून शिष्याचीच चलाखी अधिक दिसते. कारण हिचा हार तर अद्याप अर्धासुद्धां गुंफलेला दिसत नाही.

**यमु०**:—मोहनाबाई, मला नुसतें गुरु म्हटल्यानें मी कांहीं गुरु होत नाहीं. स्वारीलाच परीक्षा करूं दे, शिष्य कोण व गुरु कोण ? ( मोहनेच्या हातांतील हार घेऊन ) ही माझी अर्धीमुर्धी झालेली गुंफण पहा, नाहीं तर ही वीण कशी सुंदर पडत गेली आहे ती पहा !

**हंबी०**:—( निरखून पहात ) हा बायकोचा हार पडला, तेव्हां त्याला नावें ठेवून सोय नाहीं ! ( दुसरा घेऊन ) खरें बोलावयाचें म्हणजे तारीफ करण्याच्या योग्यतेचा हाच हार.

**यमु०**.—का, झालें मोहने ? कोण शिष्य व कोण गुरु तें ठरलें ? तुला कीं नाहीं, दुसऱ्याची उगीच प्रशंसा करण्याची फार संवय !

**मोह०**:—तुझा हार पुरा झाला नाहीं, म्हणून तसा दिसतो. पुरा झाल्यावर माझ्याहून किती तरी चांगला दिसेल !

**हंबी०**:—( यमुनेस तिचा हार देऊन ) हं, होऊं द्या एकदां पुरा. जसा हा

हार मोहक दिसतो, तसा ह्याचा सुवासहि अत्यंत गोड आहे. ( वास घेत माझें चढलेलें मस्तक ह्याच्या सुवासानें अगदीं शांत झालें. ( मोहनेस हार परत देतांना ) कोणचीहि वस्तु झाली तरी ती योग्य स्थानींच शोभते !

[ हार पुढें करतो.

**मोह०**:—तर मग आपल्या हातांतच असूं द्या.

**हंबी०**:—येथें आल्यानें हा अलभ्य लाभच झाला म्हणावयाचा. मला येथें बराच वेळ झाला, कामाची तसदी फार असल्यामुळें मला आतां रजा असावी

**मोह०**:—यमुनाबाईचा हार तयार होईतों रहावयाचें होतें ना ?

**हंबी०**:—त्याला फार वेळ लागेल. तयार झाल्यावर मी मग पाहीन. ( जाऊं लागतो. ) ( स्वगत ) ह्या लतामंडपाच्या आड जर गेलों, तर मी येथेंच आहे असें त्यांना कांहीं वाटावयाचें नाहीं. [ आड जातो.

**मोह०**:—गडे यमुने, आपण आणखी फुलें तोडूं या. स्वारीकरितां मला आणखी एक हार गुंफला पाहिजे. मग मी गुंफायला लागलें म्हणजे माझें पाहून तूंहि तसाच गुंफ, म्हणजे तुझाहि हार सुंदर होईल.

**यमु०**:—मीं त्यांच्या हातांत हार पहावयास दिल्यामुळें तुला हा दुप्पट त्रासच झाला. [ जातात.

**हंबी०**:—( पुढें येऊन ) मोत्यांच्या हिरव्या महालांत मी धरावयास धांवल्यामुळें रागावलेल्या मोहनेच्या सुंदर शरीरावर जी लावण्याची लकाकी त्या वेळीं दिसली, त्या मोहक तेजांत ह्या शांत वेळीं जरा तरी कमीपणा असावयाचा होता ! मोहक मोहने, तुला आपलीशी करण्याची संधि येईल म्हणून आज पांच वर्षं वाट पहात बसलों; अखेरीस आज तुझ्या हातचा हार माझ्या गळ्यांत लटकला ! देवगडच्या स्वारीचा बाहेर बहाणा करून कांचनगडावर हा मौल्यवान खजीना ताब्यांत घेण्याच्या माझ्या गुप्त व्रतास शकून तर उत्कृष्ट झाला म्हणावयाचा ! मोहने, पिलाजीचें मुत्सद्दी बोलणें जर मला काल खोडून टाकतां आलें असतें तर, आतां माझ्या छातीवर रुळणारा हा हार मजकरितां म्हणूनच तुझ्या कोमल हातांनीं गुंफिला असतां ! ( हार हातांत घेऊन ) किती सुबक ! किती गोड ! मोहनेच्या हातांनीं गुंफलेला ! ह्या फुलांच्या प्रत्येक पाकळींत जादू ओतप्रोत भरलेली असली पाहिजे ! विश्वामित्र ब्रह्मर्षि बनल्यानंतरही जर ह्या हारावरचा वारा त्याच्या अंगावरून गेला असता, तर तो कुत्र्याहूनांहि अति निंद्य असें रूप धारण करून मोहनेच्या पायांत घुटमळत राहण्यास खात्रीनें तयार

झाला असता ! ह्या फुलांहूनहि मृदु अशा हातांत हा हार धरून पुष्पवाटिकेंतून फिरतांना मोहनेस जर शुकमहामुनींनीं पाहिलें असतें, तर रंभेपुढें केलेल्या पांडि- त्यांतील एक शब्दहि त्यांच्या तोंडातून निघाला नसता !-मोहना दांडगाईनें आपलीशी केली तर सरदार मंडळी नांवें ठेवतील, ह्या क्षुल्लक भीतीनें मीं चार वर्षे उगीच व्यर्थ दवडलीं. सरदारांना कोण विचारतो म्हणा; पण दांडगाई केल्यानें मोहनेला आवडणार नाहीं. सध्यां मला या कामीं पिलाजीच्या तंत्रानें वागलें पाहिजे. [ जातो

---

## प्रवेश दुसरा.



**स्थळः**—प्रतापरावाचा वाडा.

[ प्रतापराव, दौलतराव व दादासाहेब कोठारे. ]

**दव०ः**—प्रतापराव, माझा सल्ला मीं पूर्वीं सांगितलेलाच आहे, आजच्याच प्रसंगीं भांडण उकरून काढूं नये.

**दादा०ः**—प्रतापराव म्हणतात तेंहि खरें आहे, आणि दवलतरावांचेंहि खोटें नाहीं. खरें आणि खोटें निवडीत बिवडीत बसण्याचें माझें काम नाहीं. शास्त्राभ्यास ज्यांनीं केला असेल, त्यांनीं असल्या पोकळ वादांत शिरावें.

**प्रता०ः**—तुमचें पांडित्य नको.

**दादा०ः**—तुमच्या वडिलांना देखील मीं मांडीवर खेळविलें आहे. काय त्यांची चतुराई ! प्रत्येक गोष्ट मला येऊन विचारावयाची ! शिवाय असें असतें, वृद्धांचा उपदेश तरुणांना रुचत नाहीं; म्हणून जेव्हां तेव्हां मसलत देण्याचे भानगडींत मजसारख्या बुढ्यांनीं पडूं नये. पण लावून खेळण्याचे वेळीं म्हाताऱ्या भिष्माचार्यांनीं कौरवांना किंवा पांडवांना कोणालाच दोन कानगोष्टी सांगितल्या नाहींत !

**प्रता०ः**—ह्यांचें पुराण सुरू झालें !—थोडक्यांत सांगा, माझा बेत तुमच्या मनास येतो ना ?

**दादा०ः**—त्याहि पक्षाचें मी मंडन करीत नाहीं, आणि याही पक्षाचें खंडन करीत नाहीं. शहाणपणाचा हाच मार्ग आहे. द्रौपदीला भरसभेंत जेव्हां ओढली, तेव्हां भीष्म, द्रोण, कृपाचार्य वगैरे मजसारखी बुढ्ढी मंडळी राजसभेंत

काय कमी होती ? पण कोणाच्या तरी तोंडांतून ह्याला रागाचा किंवा त्याला लोभाचा अ तरी निघावयाचा होता ! कृष्णाशिष्टाईचे वेळीं हीच कथा; सभेंतले सगळे थेरडे गुपचुप होते !

**प्रता०**:—त नको आहे आतां—

**दव०**:—पादशहाचा वकील केव्हां येणार आहे ?

**प्रता०**:—हंबीरराव आले म्हणजे केव्हां येणार तें समजेल.

**दव**:—खंडणी द्यावयाची नाहीं हें तर ठरलेंच, पण देत नाहीं असेंहि म्हणूं नये. आतांची वेळ कशी तरी मारून न्यावी; म्हणजे सगळ्या व्यूहवाल्यांना इषारा देऊन जय्यत तयारी ठेवावयास सांपडेल. आणि देवपुराहून खंडणी घेऊन पादशहाचें लष्कर परत आल्यावर कांहीं तरी मधाचें बोट दाखवून, एकदम छापा घालून त्यांचा खजीना लुटण्यास ठीक पडेल.

**प्रता०**:—द्रव्यासाठीं ? दवलतराव, त्या पांढऱ्या फटफटीत रुपड्यांसाठीं आजचा अपमान सोसावा काय ? अहो, दसदहाहजारांना सतत दहा वर्षें पुरेल एवढा प्रचंड खजिना कशाला गोळा केलात ? सतत दहा वर्षें लढाईच्या वाद-ळाशीं झुंजण्यास हा गड लायक व्हावा म्हणून कशाला ह्या कांचनगडावर एवढी खस्त खाल्लीत ? ह्या हरामखोर पादशहाचे पुढें मस्तक केसभरहि वांकवावयाचें नाहीं, अशा सर्वांनीं घेतलेल्या आणाशपथा, दवलतराव, आपण विसरलात काय ?

**दव०**:—शपथ विसरलों नाहीं. माझें इतकेंच बोलणें कीं, गनिमी काव्यानें कार्यभाग साधावा.

**प्रता०**:—मानगुटीवर बसून शत्रूचें नरडें दातांनीं कडाकड फोडण्याची जी वेळ त्या वेळीं कसला गनिमी कावा ? खानाच्या छावणींत एकटा सांपडलों असतों, तरी देखील आमचें रक्तशोषण करून फुगलेल्या ह्या विजापूरच्या दुष्मा-नापुढें माझें डोकें केसभरहि लवलें नसतें. गनिमी कावा लढवून ह्या चोरांना पंचवीस तीस वर्षें विजयनगरचें उरावर थयाथया नाचूं दिलेंत—बस्स झाली इतकी गुलामगिरी !

**दव०**:—व्यूहाचे मुख्य आपण आहां, तेव्हां आपले हुकूम केव्हांहि आम्हांला शिरसावंद्य आहेत. बाकी मी जर प्रतापराव असतों तर ह्या वेळेस गनिमी कावा करण्यास चुकतों ना !

**प्रता०**:—आणि मी जर दवलतराव असतों, तर युगानुयुगें गनिमी कावा करीत यवनांच्या लाथाबुक्क्या खात, सर्व जन्म घालविला असता ! ( १ )

[ हंबीरराव पिलाजी येतात.

दादा०:--हे आले हंबीरराव ! [ सर्वांचे रामराम, या बसा झाल्यावर

प्रता०:—काय हंबीरराव, खानसाहेबांनीं पाठविलेले हे वकील वाटतें ?

हंबी०:—छे: छे: ! हे माझ्या हाताखालचे पंचहजारी व माझ्या लष्करांतील मुख्य मुत्सद्दी आहेत. आपल्या वडिलांचा व पिलाजीराव मान्यांच्या घराण्याचा फार परिचय होता.

पिला०:—प्रतापरावांना मान्यांच्या घराण्यानें जाधवांकरितां काय काय केलें हें माहीत नसेल; पण त्यांच्या पदरच्या कोणाहि वृद्ध सरदारांस जाधवांकरितां मान्यांचे किती बळी पडले आहेत, हें माहीत असलें पाहिजे.

दादा०:—संभाजीराव मान्यांचे नातु पिलाजीराव तेच आपण वाटतें ? चेहरा तर अगदीं तसा आहे ! हं हं हं ! संभाजीरावांनीं ह्या गडाची हवालदारी पंचवीस वर्षे केलेली आहे. गडकऱ्याचें काम त्यांच्या हाताखालीं वीस वर्षे मीं केलेलें आहे.

प्रता०:—तर मग आमच्या दादासाहेबांच्या जुनाट दोस्तांपैकींच हे एक आहेत म्हणावयाचें ?

पिला०:—दादासाहेबांचे जुनाट दोस्त तर खरेंच; पण जाधवांचे याहूनहि जुनाट नोकर आहेत !

प्रता०:—माने, तुमच्या घराण्याविषयीं आमचे वडील नेहमीं म्हणत कीं, ह्या घराण्यांतलि प्रत्येक पुरुष मान हेंच धन समजत असतो. जाधवाचे नोकर म्हणवून घेण्यास जर तुम्हांला भूषण वाटतें तर जाधव घराण्यांतलि शेवटच्या पुरुषाचे हुकूम पाळण्यास तयार आहां काय ?—कां उत्तर नाहीं ? ह्या प्रश्नाचें उत्तर तुम्हांस देतां यावयाचेंच नाहीं ! एकसारखी यवनांची थुंकी झेलीत राहि-ल्यामुळें आमचे लोक इतके अजागळ, टाकाऊ व मऊ झाले आहेत कीं, चाळीस वर्षांपूर्वीचें आमच्या लोकांतील तेज, मान, पाणि सर्व कांहीं नाहींसें झालें आहे. पिलाजीराव, तुम्ही माझ्या प्रश्नाला उत्तर दिलें नाहीं, ह्याचें मला वाईटहि वाटत नाहीं, किंवा आश्चर्यहि वाटत नाहीं; कारण, विजापूर सोडून आपणांला एक आठवडाहि झाला नसेल !

पिला०:—प्रतापराव, सरकार,—आपल्या प्रश्नाला एकदम उत्तर देतां येत नाहीं, ह्याची मला लाज वाटते ! ज्याची भाकरी खावी त्याची इमानेंइतबारें नोकरी करावी, ह्या आमच्या अत्युत्तम गुणावर एकदम पाणी ओतवत नाहीं.

प्रता०:—आपलें सर्वस्व दुसऱ्याच्या मुठींत देणाऱ्या तुम्हां सरदारांत कोणचा

अत्युत्तम गुण उतरला आहे ? मोंगलांच्या खोलींत आम्ही होऊन आमच्या मुली ढकलण्यास शिकलों म्हणून रजपूत शेखी मिरवितात, तर हे विजयनगरचे सरदार, ' सर्व गुलामांत पहिल्या प्रतीचे गुलाम आम्ही ' म्हणून थोरवी सांगतात ! शिवाय माने, असें पहा; मोंगलाच्या हल्लींच्या अकबर बादशहासारखे पुरुष जर विजापूरच्या तक्तावर बसलेले असते, तर तुम्ही म्हणतां तेंहि बरोबर झालें असतें. प्रत्येकाला आपआपल्या धर्माप्रमाणें वागूं देण्याचा त्या बादशहाचा कट्टा निश्चय, प्रजाजनांच्या सुखाकडे लक्ष देण्याची त्याची हौस, सरदार मंडळीवर मोठमोठ्या कामगिऱ्या सोंपवून त्यांच्या पराक्रमांचें कौतुक करण्याची वहिवाट, यांपैकीं कोणची गोष्ट तुमच्या विजापूरला आहे, हा पादशहा राजधर्म पाळीत नाहीं तर त्याला आम्हीं धनी तरी कां मानावें ? माने कोण कोणाला भाकरी चारतो ? विजापुरास ठेंचून खेंचलेली संपत्ति ह्या चोरांच्या बापजाद्यांनीं आपल्याबरोबर आणिली होती वाटतें ! अहो, ही आमचीच संपत्ति ! तो सोनेरी महाल, तें हिरेजडित सिंहासन–सर्व–सर्व आमचें; आमच्या आजांपणजांनीं कित्येक वर्षें श्रम करून संपादन केलेलें ! तो बोळघुमट बांधतांना किती हिंदु गुलामांना ह्या चोरांच्या चाबुकांचा मार दररोज खावा लागे, हें तुम्हांस माहीत आहे काय ? त्या भव्य मशिदीच्या छतावर सोन्याचा मुलामा चढवितांना तुमच्या आमच्या आयाबहिणींना भ्रष्ट करून त्यांचे किती दागदागिने ह्या चोरांनीं हिसकावून घेतले. ह्याची तुम्हांला कल्पना तरी करितां येते काय ? माने, तुम्ही स्वतःचेच नोकर आहां. विजयानगरच्या तक्ताचे तुकडे तुकडे जरी झाले, तरी अद्याप त्याच तक्ताची तुम्ही भाकरी खात आहां, हें विसरूं नका.

• दव०:—हंबीरराव, माने, प्रतापरावांचें हें बोलणें ध्यानांत धरून आमच्या कालच्या प्रश्नांचें उत्तर दिलें पाहिजे.

हंबी०—होय, आणि त्या प्रश्नांचें उत्तर देण्यासच मी आतां आलों आहें. मान्यांनीं सुचविलेली मसलत मला बरी दिसली—

दादा०:—पिढीजाद्या नोकरांच्या तोंडांतून वावगी मसलत कधींहि निघावयाची नाहीं ! मान्यांप्रमाणें कोठारेहि जाधवांचे पिढीजाद नोकर आहेत; व मी दिलेला सल्ला देखील हंबीररावांसारख्या सरदारांना आवडल्याशिवाय राहणार नाहीं.

प्रता०:—मान्यांची अशी कोणती मसलत आहे ?

पिला०:—हंबीररावाचें खानसाहेबांवर मोठें प्रेम आहे व ते खानसाहेबांना

फार आवडतात. अशा स्थितींत खानाशीं उघड उघड युद्धाला उभें राहणें यांच्या हातून कांहीं व्हावयाचें नाहीं. आम्ही अशी शपथ घ्यावयाला तयार आहों कीं, कटवाल्यांविरुद्ध आमच्या तलवारी म्यानांतून कांहीं बाहेर निघायच्या नाहींत—

**हंबी०**:—व आजच्या प्रसंगांतून आपण पार पडलां म्हणजे उघडपणें कटांत सामील होण्यास आह्मी तयार आहों.

**दव०**:—हंबीररावाचे कटवाल्यांवर मोठे उपकार आहेत. प्रतापराव, हंबीररावांसारखे प्रख्यात सरदार आम्हांला मिळाल्यावर जयाविषयीं शंकाच घ्यावयास नको !

**प्रता०**:—मग इतक्या गोष्टी ठरल्या म्हणावयाच्या, कीं खानाचा समाचार आमचा आम्हीं घ्यावा, व पुढील उद्योगांत—

**हंबी०**:—हंबीरराव, एकीकडे मन तर एकीकडे शरीर, असे खात्रीनें वागणार नाहींत.

**प्रता०**:—हंबीरराव, तुमच्या वचनावर विश्वास ठेवून मी लढाईचा हुकूम देतों बरें ? दवलतराव, सर्व गडकऱ्यांना हुकूम फरमावा, कीं एक प्रहरांत गड झुंजण्यास तयार झाला पाहिजे.

**पिला०**:—आम्हीहि आमच्या तयारीस लागतों. खानाचा जासूद इतक्यांत आमच्याकडे यावयाचा आहे, तेव्हां आम्ही आतां येतों. राम. राम.

[ हंबीरराव व पिलाजी जाऊं लागतात.

**प्रता** :—( सर्व उठून हंबीररावांना पोंचवितांना ) ठरल्याप्रमाणें आम्ही वागूं लागलोंच म्हणून समजा ( हंबीररावांच्या खांद्यावर हात ठेवून ) हंबीरराव, तुमच्यावर आमचा सर्व भार आहे. हंबीररावांचें वचन कालत्रयीं फिरायाचें नाहीं, अशी विजापुरास तुमची कीर्ति आहे.

**हंबी० व पिला०**:—आमच्याबद्दल धास्ती नको. जेथें तुम्ही तेथें आम्ही आहोंच समजा.—पुढेंपर्यंत नको यायला ! येतों आतां. राम राम. [ जातात.

**प्रता०**:—कोठारे,तुमच्या स्वाधीन केलेल्या धान्याच्या व दारूच्या कोठारासंबंधानें फार सावधगिरीनें वागा.कोठाराच्या किल्ल्या कोणाहि चाकरमाणसाच्या हातीं देऊं नका. माझ्या कोठारांत दगा नसल्यावर विजापुरासारख्या छप्पन पादशाही गडावर जरी तुटून पडल्या, तरी अपयशाची भीति बाळगावयास नको. आपल्या कोठाराचा पहारा दुप्पट करा. जा, आपल्या कामाला लागा. [ दादासाहेब जातो.

**दव०**:—हंबीरराव व पिलाजीराव ह्यांच्यावर कितपत विश्वास ठेवावा ही

शका आहे; तेव्हां त्यांच्यावर सर्व भिस्त न ठेवतां, त्यांच्या या मदतीचा होतां होईल तो उपयोग करून घ्यावा.

**प्रता०**:—एक त्यांच्यावर विश्वास तरी ठेवावा, नाहींतर दगलबाज म्हणून त्यांना हाकून तरी द्यावं !

**दव०**:—एक घाव कीं दोन तुकडे, ही पद्धत मला नाहीं पसंत. उतावीळ होनां कामा नये. असें आहे प्रतापराव, तुम्हांला कोणच्याहि गोष्टीचा संशय हा येतच नाहीं. तुम्हांला कोणाचेंहि म्हणणें एकदम खरें तरी वाटतें, किंवा खोटें तरी वाटतें. माझें मन संशयी आहे; पाहिजे तर भित्रें आहे म्हणा, पण शत्रूच्या गोटांतील कोणच्या सरदारावर किती विश्वास ठेवावयाचा, हें काम तुम्हीं मजवर —आणि माझ्या एकट्यावरच—सोंपविलें पाहिजे.

**प्रता०**:—बरें, हंबीरराव व पिलाजीराव ह्यांच्याशीं तुम्ही सांगाल तसें आम्ही वागतों, झालें ! बरें आतां मी असें करतों, सर्व गड फिरून येतों. गडाची झुंजण्याची तयारी पुन्हां एकवार पाहिली म्हणजे मनाला बरें वाटेल ! ( दवलतराव जाऊं लागतो. ) कटांतील सर्व सरदारांना 'तयार असा' म्हणून इशारतीचीं पत्रें आतांच गेलीं पाहिजेत.

**दव०**:—त्याच उद्योगाला मी आतां लागतों. [ जातो.

**प्रता०**:—( स्वगत ) आमचेच सरदार, आमच्या विजयानगरचे सरदार, आमच्या धर्माचे सरदार, आमच्या हाडारक्ताशीं संबंध असलेले सरदार, आमच्याशीं दगलबाजी करतील, असें दवलतरावांना वाटतें तरी कसें ? विजापूरकरांचे 'चाकर' म्हणवून घेण्यांत अस्सल बीजाच्या या सरदारांना भूषण वाटत असेल अँ ! ह्या लोकांनीं आमचे डोळे उघडे असतांना आमच्या घरांत शिरून पादशाही गाजवावी आणि विजयानगरचें तापलेलें रक्त गोठून थंडगार व्हावें, हें संभवतें तरी कसें ? हंबीररावांवर पादशहाची मेहेरबानी आहे म्हणे ! आपल्या जिवावर चाललेली या पादशहाची चैन पाहून जोंपर्यंत हंबीररावांच्या मनांत द्वेषाग्नि पेटत नाहीं, " आम्ही सरदारांचे बच्चे, " " आम्ही राजाचे वंशज, " अशी आठवण होऊन जोंपर्यंत हंबीररावांचें मन धडपडत नाहीं, आमच्या धर्माच्या यातना पाहून जोंपर्यंत हंबीररावांच्या मनाला तळमळ लागून रहात नाहीं तोंपर्यंत पादशहा हंबीररावांची पाठ थोपटणार, तोंपर्यंतच हंबीररावांना किताब मिळणार, आणि एखाद्या नासक्या कुचक्या खानाच्या ताबेदारींत स्वारीबरोबर फिरावयाला मिळण्याची मेहेरबानी होणार ! पादशहाच्या ताटांतील उष्टीं पक्वान्नें चाखावयाला

मिळतात. म्हणून विजयानगरच्या अब्रूवर रखरखलेले निखारे ठेवण्यास हंबीरराव तयार होतील काय ? नाहीं, नाहीं; विजयानगरचें शुद्ध रक्त अद्याप इतकें बाटलेलें नाहीं, अद्याप इतकें कुजलेलें नाहीं; आम्हां सरदारांच्या मनांत—( पडद्यांत मंजुळ आवाज ) अरे ! मी विचार करीत करीत मोहनेच्या महालापाशीं आलों ! ( कानोसा घेऊन ) झोंपाळ्यावर बसून दोघीतिघी ओंव्या म्हणत आहेत ! हलकेंच आंत जावें !

[ पडदा वर जातो. झोंपाळ्यावर मोहना व यमुना बसल्या आहेत, जवळ चंपा दासी उभी आहे. ]

**यमु०**:—आतांची ओंवी शेवटची अं ! मेणा बाहेर उभा असेल.

**मोह० व यमु०**:—( मिळून )—

**कांचनाच्या किल्ल्यावरि,**
**कशासाठीं ग उत्सव केला ।**

**यमु०:—राजा शहाजी पुत्र झाला ।**
**मोहनाबाईला,**

**यमु०**:—( झोंपाळ्यावरून उतरून ) सबंध कांग ओंवी म्हटली नाहींस मोहने ?

**मोह०**:—पहिल्याचें नांव घेऊं नये असें आहेना ?

**यमु०**:—असें का ? बरें तर मी येतें अं; मेणा बाहेर वाट पहात असेल. शेवटची ओंवी देखील मजबरोबर धड म्हटली नाहींस, ध्यानांत असूं दे अं !

[ जाऊं लागते.

**मोह०**:—आणखी एक ओंवी म्हणूं या, मग जायला निरोप देतें. अगदीं तूं जशी म्हणशील तशी म्हणतें मग तर राग नाहींना ?

**यमु०**:—चंपे, तूं काल म्हणत होतीस ती ओंवी तुझ्या बाईसाहेबांना फार आवडतेना ?

**चंपा०**:—पण ती ओंवी बाईसाहेब एकट्याच आपल्याशीं म्हणतात.

[ मो० य० झोंपाळ्यावर बसतात.

**यमु०**:—म्हणायचें अं बाईसाहेब, आतां एक शब्द सोडावयाचा नाहीं बरें !

**य० व मो०**:—( दोघी मिळून )

**कांचनांच्या किल्ल्यावरी,**
**मोहित्यांची मोहना आली ।**
**मन मोहुनी राणी झाली**

**यमु०**:—**प्रतापरावांची.**

**यमु०**:—आतां कांग मध्येंच थांबलीस ?

**मोह०**:—हो ! तूं अशा भलत्यासलत्या ओंव्या म्हणावयास लागलीस तरी मी कांहीं फसावयाची नाहीं !

**यमु०**:—मी म्हणेन तशी म्हणणार होतीस ना ? तें तरी तुझं खोटें झालें ! बरें मी येतें आतां मोहने, पुन्हां वरचेवर गांठ पडेलच. मेणा अगदीं तयार दारांत उभा आहे.

**मोह०**:—मी आलें मेण्यापर्यंत. [ दोघी जातात.

**प्रता०**:—( पुढें होऊन ) हंबीररावांची बायको हिला भेटायला आली म्हणजे दोघीहि आनंदानें ओंव्या म्हणतात, थट्टामस्करी करितात; पण तीच माझी आणि हंबीररावांची गांठ पडली म्हणजे आमच्या मनाला एका भयंकर आणि गूढ खड्ड्यांत पडल्यासारखें होऊन, सुख आणि शांति ह्यांपासून आम्ही लांब लांब पळतों आहोंसें वाटतें !—उद्यां, आज, घटकेनें देखील लढाई जुंपविण्याचे आमचे बेत जर ह्यांना कळविले, तर तें गोड हास्य क्षणांत नाहींसे होईल, तें आनंदी कुजबुजणें बंद पडेल, व डोळ्यांत चमकणारा तो सुखाचा तजेला दुःखाश्रूंनीं वाहून जाईल ! सर्व सृष्टींत ईश्वरानें सुखी कोणाला उत्पन्न केलें आहे, ह्याचा विचार करीत असतां जर मोहनेच्या चेहऱ्याकडे दृष्टि गेली, तर बायकाच सर्वांत सुखी असें एकदम उत्तर द्यावेंसें वाटतें. परंतु गुलामगिरींतल्या अपमानाचा सब मारा ज्यांना रात्रंदिवस सोसावा लागतो, मान, आधिकार, आपलेपणा ह्यांकरितां सर्वकाळ शरीरास झिजवून दुःखी शरीरांत मानी मनाचा ज्यांना कोंडमारा करावा लागतो, अशा असंतुष्ट व नेहमीं धडपड करणाऱ्या पुरुषजातीशीं असली मोहक व आनंदी जात ईश्वरानें ज्या अर्थी जखडून टाकलेली आहे, त्या अर्थी जगांत कोणींच सुखी असूं नये, मोहनेनें देखील आनंदी राहूं नये, असाच ईश्वरी संकल्प असावासा दिसतो. ही पहा आनंदाची मूर्ति परत आली. [ चंपे, चल जा तूं.

[ चंपीच्या जागीं उभा रहातो.

**मोह०**:—( पडद्यांत ) कायग सटवे चंपे, यमुनेला ती ओंवी सांगायला तुला कोणींग सांगितलें होतें ? ( बाहेर येतां येतां ) नसता कारभार करण्याची हौस भारी. एकदां तिकडे स्वारींपाशीं तेवढी ओंवी म्हणून दाखीव (पडद्याबाहेर) म्हणजे सुटलीस; ढालगज भवानी—

**प्रता०**:—मोहनेनेंच ती ओंवी प्रतापरावांना म्हणून दाखविली ! चंपीकडे कांहीं दोष नाहीं !

**मोह०**:—केव्हां आली स्वारी बाई ! अगदीं न कळत !

**प्रता०**:—आपण जो कांचनगडावर जय मिळविला, त्याचें वर्णन चाललें असतानांच मी आलों.

**मोह०**:—बायका कोठें जय का मिळवितात ?

**प्रता०**:—तें काय मला माहीत ! गाण्यांत होता तो मजकूर मीं सांगितला.

**मोह०**:—कोणच्या ओंवींत ?

**प्रता०**:—ती ओंवी नाहीं माझ्या ध्यानांत राहिली. आपल्या पराक्रमाचें तें वर्णन आपल्या तोंडून ऐकण्यासाठीं मी येथें आलों. बसायचें आतां झोंपाळ्यावर !

[ झोंपाळ्यावर बसतात,

**मोह०**:—आपल्या पराक्रमाचें वर्णन करायचें ना ?

**प्रता०**:—होय, आपल्या पराक्रमाचें.

**मोह०**:—**कांचनाच्या किल्ल्यावरी**
**मुसलमानांनीं**

**प्रता०**:—मुसलमान कां म्हणून ह्या ओंवींत ? कांचनगडच्या किल्ल्यावर, प्रतापरावांच्या रंगमहालांत, आणि मोहनेच्या तोंडीं मुसल्मान ?

**मोह०**:—ओंवी पुरती ऐकायची तरी होती ? आपल्याला शत्रू असतात, म्हणूनच कीर्ति मिळत असते हो.–रावण जर नसता, सीतादेवीला जर त्यानें चोरून नेलें नसतें, तर एवढा पराक्रम करून दाखवावयाचा प्रसंगच रामरायाला मिळाला नसता.

**प्रता०**:—आम्हांला हे शत्रूहि नकोत, आमची देवी चोरून न्यावयास नको, व पराक्रम गाजवायालाहि नको !–हं संपीव एकदां ओंवी.

**मोह०**:—**कांचनाच्या किल्ल्यावरि,**
**मोहित्यांची मोहना—**

**प्रता०**:—थांबायला कांहीं नको–आली–आणि तिनें काय पराक्रम केला ?

**मोह०**:—पण मीं ही ओंवी म्हणावयाचीच नाहीं.

**प्रता०**:—खात्रीनें तुला असें झालं आहे, केव्हां एकदां ती ओंवी म्हणून दाखवीन ! जिभेवर ती नाचते आहे, केव्हां बाहेर पडेन म्हणून ! हं म्हण ती.

**मोह०:—कांचनाच्या किल्ल्यावरि,**
**मुसलमानांनीं दीला वेढा ।**
**विजयि वीराची दृष्ट काढा ।**
**प्रताप—**

**प्रता०**:—नवऱ्याच्या नांवात ~~काय ती सगळी लाज येऊन भरली आहे~~ मोहने—

**मोह०**:—नांव घेऊन काय ती हांक मारावयाची अगदीं ?

**प्रता०**:—ज्या नांवाचा जप घेऊन आम्ही बसतों, तें मोहक नांव उच्चारण्यास तुझ्यासारखी कांहीं आम्हांला लाज नाहीं वाटत !

**मोह०**:—बायका देखील नांवाचा जप करीत बसतात हो, पण पुरुषासारखी त्यांनीं लाज कोठें सोडली आहे.

**प्रता०**:—दाराच्या आड उभे राहून आम्ही ‘ प्रतापराव ’ ‘ प्रतापराव म्हणून पाहिजे तितक्या ओव्या ऐकल्या तरी हरकत नाहीं, महालांत आम्हीं पाय’ ठेवला, कीं लाजेचें राज्य सुरू झाले; असला रिकामा हट्ट नको. आतां मोहित्यांच्या मोहनेनें कांचनगडावर, कोणचा पराक्रम केला ? त्या पराक्रमाबद्दल तुला वाईट वाटत असेल तर ओंवी म्हणणार नाहींस.—नाहींना म्हणायाची ? जाऊं आम्ही ?

**मोह०**--हें काय तें, म्हणतें हो.

**कांचनाच्या किल्यावरि,**
**मोहित्यांची मोहना आली ।**
**मन मोहुनी राणी झाली ।**
**प्रतापरावांची.**

**प्रता०**:—बायकांना नेहमीं आर्जवें करून घेण्याची फार संवयच !—‘ मन मोहुनी राणी झाली प्रतापरावांची’

**मोह०**:—या ओंवीचा इतका कसला विचार करावयाचा पण ?

**प्रता०**:—मोहने, तुला खरें सांगूं का ? मोहित्यांची मोहना माझी राणी ज्या वेळीं झाली, त्या वेळीं माझ्या आयुष्यांतील सर्वांत मोठी चूक मीं केली, असें मला वाटतें.

**मोह०**:—असें कां वाटतें महाराज ? ह्या दासीच्या हातून सेवेंत तर चूक झाली नाहींना ?

**प्रता०**:—तुझ्या हातून चूक होणें शक्य तरी आहे काय ? तूं सर्वगुणसंपन्न आहेस म्हणूनच तुझ्याशीं मी लग्न केलें, ही चूक केलीस मला वाटतें.

**मोह०**:—जगदंबे, इकडच्या मनांत हे विचार तरी कसे येतात !

**प्रता०**:—पादशहाच्या जुलमाचें जूं झुगारून देण्याचे माझ्या हाडामांसांत लहानपणापासून खिळून राहिलेले बेत, लग्नपाशांत अडकूं नको, लग्नपाशांत सापडूं नको, म्हणून ओरडत असतांना, मोहनेच्या ताब्यांत मीं आपलें मन जाऊं दिलें ! असो; झाली गोष्ट ती होऊन गेली. आतां मी अवचित महालांत आलों याचें कारण तुला एक बातमी कळवावयाची आहे. एक दिवसांत पादशहाच्या सैन्याशीं लढाई जुंपण्याचा संभव आहे. तेव्हां–तुजवरच्या अतिशय प्रेमामुळेंच मी तुला हें सांगत आहे–शहाजी जसा आजोळीं गेला आहे तशी तूंहि या लढाईचा अखेर निकाल लागेतों मोहित्यांच्या सोनगडावर रहावयास गेलीस—

**मोह०**:—नाहीं, महाराज नाहीं; मी आपणांला सोडून कोठेंहि जावयाची नाहीं; आणि मोहनेला टाकून द्यावयास स्वारी पण कशी तयार होईल ?

**प्रता०**:—टाकून द्यावयाची मी गोष्ट तरी बोललों ? सोनगडावर कांहीं दिवस रहा; थोडक्याच दिवसांनीं विजापुरांत समारंभानें जेव्हां आम्ही प्रवेश करूं, त्या वेळीं तुला न्यावयास येईन.

**मोह०**:—मागाहून न्यावयास यायचें, तें विजापुरचें तटावर आपलें सैन्य हल्ला करीत असतांना, मी बरोबर असले म्हणून काय झालें ?

**प्रता०**:—व्हावयाचें काय ? तुला दुःख होईल म्हणून म्हणतों, ह्या वेळीं मजबरोबर राहण्याचा हट्ट धरूं नको.

**मोह०**:—महाराज, ज्या वेळीं आपण माझ्या हातांत लग्नकंकण बांधलें त्याच वेळीं मी आपल्या सुखाची त्याप्रमाणें दुःखाचीहि वांटेकरीण झालें आहे. मोहना जी आपली झाली, ती सुखाच्या सावलींत तेवढी आपल्याजवळ राहण्याकरितां नव्हे; तर दुःखाच्या रखरखणाऱ्या उन्हांत देखील मोहनेनें आपल्या शेजारींच राहिलें पाहिजे. तालिकोटच्या लढाईनंतरहि यवनाशीं जन्मभर ज्यांनीं उभा दावा ठेवला त्या महात्म्या संभाजीराव जाधवांची मी सून ना ? आपल्या वाडिलाच्या व्रताची दीक्षा लहानपणींच जगदंबेच्या पायावर हात ठेवून ज्यांनीं घेतली, त्या नरवीरांचीं मी पत्नी ना ? विजापुरकरांच्या विरुद्ध विजयानगरास मदत करण्यास प्रथमपासून तयार असलेल्या सूर्याजीराव मोहित्यांची मी कन्या ना ? महाराज, आपणांपासून जर ह्या वेळीं मी दूर राहिलें तर सासरच्या आणि माहेरच्या

दोनांहि कुळांना बट्टा नाहीं का लागणार ? नाहीं, माझ्या हातून अशी गोष्ट कधींहि होणार नाहीं.

**प्रता०**:—पण लढाईचा त्रास सोसण्याकरितां ईश्वरानें स्त्रियांचें शरीर घडविलेंच नाहीं.

**मोह०**:—आपल्यावर असलेल्या माझ्या निष्कपट प्रेमाच्या जोरावर मी आपल्याबरोबर हव्या तेवढ्या भयंकर यातना सोसण्यास तयार होईन. रामरायाबरोबर अरण्यवास करण्याकरितां निघालेल्या ज्या सीतेनें राजमंदिरासभोंवतालच्या बागांचा संपण्यापूर्वींच दंडकारण्य आलें कीं नाहीं म्हणून विचारलें, तीच सीता पुढें सतत चवदा वर्षें भयंकर राक्षसांशीं लढतांना अरण्यांत रामरायाच्या शेजारीं होती ना ? दोघांत मिळून असलेल्या एकाच वस्त्रावर दमयंतीनें नळराजाबरोबर अरण्यांत दिवस सुखानें घालविले नाहींत काय ?

**प्रता०**:—मोहने, दमयंती, सीता, यांच्यासारखी तुझी योग्यता आहे; पण मी अभागी, पापी; तेव्हां प्रेम म्हणून ज्याला म्हणतात त्यानें माझें सर्व अंतःकरण व्यापून टाकिलेलें नाहीं; आणि तूं जवळ असल्यानें तुझ्या संरक्षणाचे विचार माझ्या मनांत येतील, आणि माझ्या द्वेषाग्नीची ज्वाळा लढाईच्या वेळीं जितकी भडकावयास पाहिजे तितकी भडकणार नाहीं.

**मोह०**:—महाराज, माझ्या संरक्षणाची काळजी नको करायला. वीरपत्नीनें कसें वागावें, हें मला समजतें. शिवाय मी जवळ असल्यानें आपला दुःखभार कांहींना कांहींतरी हलका करीन. रथाच्या चाकांत कण्याऐवजीं हात घालून दशरथाला त्याच्या बायकोनें मदत केली नाहीं का ? नरकासुराला मारावयाच्या वेळीं सत्यभामेची श्रीकृष्णाला काय थोडी मदत झाली ?

**प्रता०**:—तुझ्याशीं वाद करून हा तंटा मिटावयाचा नाहीं. साधुमहाराजांच्या कानावर ह्या सर्व गोष्टी घालतों, आणि ते मग सांगतील त्याप्रमाणें करावयाचें. चल, गडाची तयारी पाहत पाहत त्यांच्याच दर्शनाला जाऊं.

[ पडदा.

---

## प्रवेश तिसरा.



**स्थळ**:—कांचनगड.

[ पिलाजी माने येतो. ]

**पिला०**:—कांचनगडचा एवढा भयंकर कडेकोट बंदोबस्त असेल, असें मला वाटलें नव्हतें ! आमच्या सैन्याच्या पांचपट सैन्य पन्नास वर्षे गराडा देऊन राहिलें तरी काय होणार आहे? हंबीररावांना मोहना मिळणार कशी, व पिलाजीराव सरदार मंडळींत अग्रणी होऊन हलके हलके पादशहाचे वजीर तरी होणार कसे ? मामला कठीण दिसतो ! माझी सर्व भिस्त आतां दादासाहेब कोठाऱ्यांवर व त्यांच्या पाटाच्या बायकोवर आहे ! गड अचानक जर आमच्या स्वाधीन झाला तरच पिलाजीरावाची चलती ! पाटाच्या बायका व व्यसनी थेरडे या कामीं फार उपयोगीं पडतात. माझी व तिची थोड वेळ गांठ पडली; आमची विजापुरची पक्की ओळख; कडूंतली ही चंचल बया मान्याच्या अस्सल घराण्यांतील पुरुषाशीं त्या वेळीं पाट लावावयाला पहात होती ! दादासाहेबांच्या एकंदर स्वभावाचें तिनें वर्णन तर चांगलें केलें ! अरे, विचार करीत करीत मी दादासाहेबांच्या घराजवळ तर आलों. [ घरांत जातो.

( पडदा वर जातो. दादासाहेब हातांत गुडगुडी घेऊन बसले आहेत. लक्ष्मी निखारे ठेवीत आहे. )

**दादा०**:—( एक दम मारून ) छे ! अशानें कांहीं व्हावयाचें नाहीं; अगदीं रखरखलेले पाहिजेत.

**लक्ष्मी**:—निखारे भरतां भरतां माझे हात मेले दमून गेले, पण हिकडे त्याचें कांहीं आहे का ? हा ओला गोळा आंत असल्यावर मग आग तरी कशी लागेल ! मी नाहीं आणखी निखारे आणीत जा.

**दादा०**:—कालपासून गडावर लढाईच्या कायद्यांचा अंमल सुरू आहे. हुकूम फरमावला कीं तो पाळलाच पाहिजे. कर्ण एवढा दुर्योधनाच्या नाकांतला बाल, आणि द्रोणाचार्यांना कर्ण पाण्यांत पहात असे, पण द्रोणाचार्य सेनानायक असेतों, रणांगणांवर कर्णानें त्यांचा केसभरहि अपमान केलेला नाहीं. लढाईचे कायदे असे पाळावे लागतात ! निखारे घाल, म्हणजे घातले पाहिजेत. ओला गोळा आहे कीं कोरडा आहे, पंचाईत करण्याची जरूरी काय ?

**लक्ष्मी**:—अहारे वीर ! बायकोवर हुकूम फुरमावणारे ! कर्णद्रोणाच्या गोष्टी कशाला सांगतां ? धान्याच्या आणि दारूच्या कोठारावर बसवून ठेवून, प्रतापराव दळुबाईचें काम सांगताहेत, हें जसें कांहीं आम्हां बायकांना कळतच नसेल ! मोहनाबाईनीं माझा अपमान केला, मला बाजारबसवीच्या इतकाहि मान द्यावयास नको असें म्हणाल्या, त्याबद्दल जरातरी लाज वाटायला पाहिजे होती, जरातरी राग यायला पाहिजे होता ! पण इकडनें सगळें शौर्य, राग, पांडित्य बायकोपाशीं ! मी नाहीं जा आणखी निखारे आणीत, पाहिजे तर आपणच घेऊन यावेत.

**दादा०**:—भारती युद्धाचे वेळीं बायकांनीं पुरुषाचा असाच जर मान ठेवला असतां, तर भीमार्जुनांच्या हांतून असे मोठमोठे पराक्रम झालेच नसते. तुम्ही अशा निर्लज्ज व अडदांड झालेल्या आहांत, म्हणूनच हे विजापुरकर आमच्यावर राज्य करीत आहेत. आणावेत आपणच निखारे, झाले ! [ जातो.

**लक्ष्मी**:—ज्या पुरुषांना आपल्या बायका संभाळतां येत नाहींत, त्यांनीं गुलाम होऊं नये तर व्हावें तरी काय ? [ पिलाजीराव पुढें येतो.

**लक्ष्मी**:—कोण पाहिजे ?

**पिला०**:—दादासाहिब आहेत का ? मी पिलाजीराव माने विजापुरचा.

**लक्ष्मी०**:—पिलाजीराव या; मी तुमची वाटच पहात होतें आतां याल मग याल म्हणून ! काल लवकर येईन म्हणून म्हणालां होतां.

**पिला०**:—जरा उशीर झाला. दादासाहिब कोठें आहेत ?

**लक्ष्मी**:—आंत गेले आहेत; इतक्यांत येतील. माझ्या प्रश्नाचा विचार केलांत का ? हुद्देसुळकरांचा कैवार घेऊन माझा सूड उगविण्याकरितां, का—

**पिला०**:—सूड उगविण्याकरितां दादासाहेबांचा स्नेह संपादला, कां पूर्वीची चूक दुरुस्त झाली तर पहावी म्हणून संपादला, हें एक ईश्वराला माहीत.

**लक्ष्मी**:—काय माझ्याविषयीं तुमच्या मनांत पूर्वीइतका तिटकारा नाहीं ? प्रेम,—प्रेम नसो मेलें, माझा राग तरी येत नाहीं ना ?

**पिला०**:—पूर्वी देखील राग हा नव्हताच—खांद्याला खांदा भिडून ज्यांच्या शेजारीं पांचदहा लढायांत मी लढलों, ज्या खंडेराव हुद्देसुळकरांनीं एक दोन वेळां माझे प्राण वांचविले, ज्यांनीं रणांगणांवर प्राण सोडतांना आपल्या बायकोचें रक्षण करण्यास मला सांगितलें, त्यांच्या बायकोशीं—

**लक्ष्मीः**—पुरे झालें धर्मशास्त्र. दुसऱ्या त्या अवदसेनें तुम्हांला घेरलें होतें, म्हणूनच मला ह्या इथे दुःखाचे डोहांत लोटून द्यावयास तयार झाला! दादासाहेबांचें त्या वेळीं तोंड देखील पाहिलें नसून मजपाशीं दादासाहेबांचे पोवाडे गातांना आपणांस कसें वाईट वाटलें नाहीं कोण जाणे!

**पिला०**:—त्या वेळची स्थिति निराळी होती. पांच वर्षांपूर्वी जो प्रेमाग्नि धुमसत होतासा वाटत होता, त्यानें आतां पेट—

[ पडद्यांत " दिझालेले सगळे निखारे! फुललेला निखारा शोधून काढावयाला इतका वेळ लागला! शेगडी नेहमीं रखरखलेली असूं दे, म्हणून ताकीद दिलेली एकाच्या ध्यानांत असेल तर शपथ!" ]

**लक्ष्मीः**—स्वारी आली अं! तुम्हांला पुष्कळ सांगावयाचें आहे, पण आतां नको— [ धूर सोडीत दादासाहेब येतात.

**पिला०**:—रामराम दादासाहेब. माझ्या बाबांच्या मित्राची भेट झाली म्हणजे जो आनंद होतो,—

**दादा०**:—( धूर सोडीत ) हो हो! साहाजिक आहे. आनंद काय विचारावा—हं! गोष्ट—संभाजीरावांचा आणि माझा—हं गोष्ट—माझा स्नेह तसाच होता!—गोष्ट!—बसा पिलाजीराव—परकी पुरष—तुम्हांला पाहून आनंद होतो—परकी, गोष्ट!—बसाहो!

[ बसतात; दादासाहेब लक्ष्मीस जावयास खुणावतो. ती तशीच उभी राहते. ]

**पिला०**:—दादासाहेब, मी कांहीं परकी नाहीं; त्यांना एथें असावयाला हरकत नाहीं. खंडेराव हुद्देसुळकरांच्या घरीं—

**दादा०**:—खंडेरावांची ही भगिनी!

**पिला०**:—म्हणूनच म्हणतों मी परका नाहीं. तुम्हांला माहीतच आहे, खंडेरावांचा आणि माझा स्नेह अतिशय; सख्या भावाप्रमाणें एकमेकांवर आमचें प्रेम; खंडेरावांच्या जागीं आतां मीच यांना आहे.

**लक्ष्मीः**—( स्वगत ) बरें झालें! मी खंडेरावांची बहीण म्हणून पूर्वीं ह्यांना सांगितलें होतें; पिलाजीराव विसरून भलतेंच बोलतात कीं काय, अशी मला मोठी भीति होती.

**दादा०**:—( चिलीम पिलाजीरावांकडे करीत ) घ्या हो, दिव्यवल्लीच्या थोड्या मिश्रणापेक्षां विशेष कांहीं नाहीं. जम कसा बसला आहे, पहा तरी!



दादा०:—गोषा!—बसा पिलाजीराव-परकी पुरुष तुम्हाला पाहून आनंद होतो—परकी.
गोषा—बसाहो? [पृ० २०

**पिला०:**—छे हो, नको; हंबीररावांनीं आपल्या सर्व सैन्याची देखरेख मजवर सोंपविल्यामुळें निशा करण्याचें मीं बहुतेक सोडून दिलें आहे.

**दादा०:**—ह्या चिलमींत कांहीं विशेष जीव नाहीं. माझें म्हणणें तर असें आहे कीं, एकाग्रचित्तानें काम करण्यास ह्यासारखा दुसरा उपाय नाहीं. महाभारतांत ही गोष्ट नमूद केलेली नसली, तरी मी खात्रीनें सांगतों कीं, भीमकर्मा वृकोदर ह्या वल्लीचें सेवन करीत असलाच पाहिजे.

**पिला०:**—( चिलीम घेऊन ) ह्यानें चित्त एकाग्र होतें खरें; तथापि सेनानायकांना अनेक गोष्टींकडे एकाच वेळीं लक्ष द्यावें लागतें. शिवाय रात्रीच्या सामसुमींत करावयाच्या गोष्टी दिवसां करणें जरा अप्रशस्तच !

**दादा०:**—बरोबर बोललां. ह्याचसाठीं दिवसां मी दारूच्या एका थेंबाला देखील शिवावयाचा नाहीं. ज्याच्या पोटांत खोल लपवून ठेवलेलें एखादें गुपित आहे त्यानें तर दिवसां दारूकडे पाहतां देखील कामा नये, अशी जी शुक्राचार्यांची आज्ञा आहे, ती अनुभवानें खरी ठरली आहे. शुक्राचार्य दारू पीत असत, म्हणूनच कचाला संजीवनी विद्या त्यांच्या पोटांतून बाहेर काढून चव्हाट्यावर आणण्यास संधि मिळाली. [ पिलाजीरावांकडून चिलीम घेतो.

**पिला०:**—मनुष्याला निशा करावयाला मिळावी, म्हणूनच ईश्वरानें रात्र उत्पन्न केली आहे. मुलांना मनमुराद खेळायला, हंसायला, खिदळायला मिळावें, म्हणून वडील माणसें जसा खेळावयाच्या जागेकडे कानाडोळा करितात, तसेंच मनुष्याला स्वेच्छाचाराचा उपभोग घेतां यावा, म्हणून सर्व विश्वाचा शास्ता सूर्यनारायण मानवांचे कृतींवर नजर ठेवण्याचें काम रात्रीं बंद ठेवितो. माझा नेहमींचा प्रघात असा आहे कीं, रात्रीं मजेनें जरा मदिरापान करावें, दिवसां मात्र तसल्या कोणच्याहि पदार्थाला स्पर्श देखील करावयाचा नाहीं.

**दादा०:**—दारूचें सेवन रात्रींच विहित आहे. शिवाय शास्त्राज्ञा अशी आहे कीं, पुरुषानें एकट्यानें मदिरापान करूं नये. सुखोपभोगाला तजेला आणणारी निशा मदिरापानाशिवाय प्राप्त होत नाहीं, म्हणून दारूची योजना रात्रीं रंगमहालांतच शास्त्रकारांनीं केली आहे. मन कठोर व बेफिकीर करण्याच्या कामीं ही वल्ली वस्ताद, म्हणून हिचें सेवन अस्मादिक दिवसां करितात.

**लक्ष्मी:**—ही चिलीम हातांत असली कीं, ज्याच्या त्याच्यावर तारवटायचें; आणि मेली ती दारू घेतली कीं, भलतेंसलतें एकसारखें बरळायचें, तेव्हां दोन्ही नसलेली बरी.

**पिला०**:—पुरुष जर मधुर प्रेम बडबडूं लागले, बायका जर गोड प्रीति बडबडूं लागल्या, व प्रेमातिरेकानें बहकून सुखोपभोगाचा व चैनीचा आनंद जर सर्वच बडबडूं लागले, तर त्यांच्या बडबडण्याला कोण नांवें ठेवील ?

**दादा०**:—बडबडण्यासंबंधानें प्रत्येकानें सावधगिरी ठेवली पाहिजे. पूर्वी एकदां दिवसां मीं दारू घेतली होती. त्या वेळीं असाच तुमच्यासारखा मोठा गृहस्थ आला होता. बोलतां बोलतां बरळून गेलों कीं, ह्या शेजारच्या भिंतींतला दरवाजा उघडला कीं, तळघराला दोन दरवाजे लागतात. उजव्या अंगच्या जिन्यानें खालीं गेलें कीं, तोफेचे गोळे, दारूचीं पोतीं, हत्यारें, ह्यांचें तळघर; आणि दुसऱ्या बाजूला धान्याच्या सांठ्याचें तळघर. इतकें बोलून गेलों आणि पोटांत चर्र झालें ! ज्यांच्याशीं बोललों, तो प्रतापरावांच्या विरुद्ध आहे का कसा आहे, हें कांहींच ठाऊक नव्हते !

**पिला०**:—छे ! अशा बोलण्यानें एखादें नसतें अरिष्ट अंगावर कोसळावयाचें !

**दादा०**:—हें काय विचारावें ? धान्याचा आणि दारूचा गडावरील मोठा सांठा म्हणतात तो कोठें आहे, हें पांचसात असामींशिवाय कोणालाहि माहीत नाहीं. हीं नेहमीं म्हणत असतों कीं, किल्ल्यांचा एक झुबका जवळ आहे, झालें ! अधिकार नाहीं न् बिधिकार नाहीं. मी म्हणतो, पिलाजीराव, ह्या किल्लीनें तो दरवाजा उघडला आणि चिलमींतला एक निखारा जर तळघरांत फेंकून दिला, तर एका क्षणांत गड जमीनदोस्त होईल. पिलाजीराव, तुम्हीच सांगा, किती जबाबदारीचें हें काम आहे तें ?

**पिला०**:—जबाबदारीचें म्हणजे ! प्रतापरावांच्या—आमच्या सर्वांच्या—कारस्थानाचें नाक तुमच्या हातांत आहे. [ हुजऱ्या येतो.

**हुज०**:—दादासाहेबांना सरकारांनीं बोलाविलें आहे, जसें असाल तसें येऊन चला म्हणून सांगतलें आहे.

**दादा०**:—कोण कोण आले आहेत रे ?

**हुज०**:—सरकार दवलतरावापाशीं बोलत बसले आहेत.

**दादा०**:—हो तूं पुढें; मी हा आलोंच. ( रामराम करून हुजऱ्या जातो. ) प्रतापरावांना माझ्याशिवाय चैन पडत नाहीं; कसलेंहि कारस्थान असो, 'दादासाहेबांना बोलवा' ! तुम्हांला नाहीं का यावयाचें प्रतापरावांकडे ?

**पिला०**:—हंबीरराव व मी नुकतेंच त्यांची भेट घेऊन आलों. हंबीरराव तेथेंच राहिले. आपली—ह्यांची—गांठ घ्यावयाची होती, म्हणून मी येथें आलों.

**लक्ष्मी**:—आज येथेंच रहावयाचें म्हणून त्यांना आग्रह करावयाचा होता.

**दादा०**:—पिलाजीराव, तुम्हांला आज येथें राहिलेंच पाहिजे; त्यांचा शब्द मोडणें केव्हांहि चांगलें होणार नाहीं. आजच्याशिवाय, उद्यां, परवां, केव्हां तुमच्या सोईला येईल तेव्हां, रात्रीच्या मेजवानीला आलें पाहिजे.

**पिला०**:—दादासाहेब, मला कांहीं आमंत्रणाची जरूर नाहीं; मी घरचाच आहें.

**दादा०**:—गण्या—कोण आहे रे बाहेर—गण्या, चल, मला वाड्याकडे जावयाचें आहे. मी आतां जाऊन येतों. [ किल्ल्या तेथेंच टाकून जातो.

**लक्ष्मी**:—किती दिवस मुक्काम आहे ?

**पिला०**:—पांच किंवा सात दिवस.

**लक्ष्मी**:—हुद्देसुळकरांचे जागीं मीच आहें म्हणून आतां कबूल केल्याची आठवण आहे ना ?

**पिला०**:—ज्या गोष्टीकरितां ह्या देवपुरच्या स्वारींत कांचनगडापर्यंत तरी मी येतों म्हणून हंबीररावापाशीं हट्ट धरला, ती गोष्ट मीं विसरेन असें तुला वाटतें काय ?

**लक्ष्मी**:—पुरुषांचा काय नेम बाई ? आपले शब्द खरे केलेच पाहिजेत, असा निर्बंध पुरुषांना कोठें आहे ? देवपुराहून परस्पर नाहींना जाण्याचा विचार ?

**पिला०**:—देवपुरला न जातां कांचनगडाहून विजापुरला परत जाण्याचा माझा विचार आहे. [ किल्ल्या उचलून हातांत घेतो.

**लक्ष्मी**:—तुमचें काय ? विजापुरला परताल, देवपुरला जाल, किंवा कांचनगडला रहाल ! स्वतंत्र आहां. आम्हां बायकांचें जिणेंच वाईट; पिंजऱ्यांत कोंडलेल्या पोपटाला कैदखान्यांत सुखानें दिवस कसे कंठावे, हें शिकल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

**पिला०**:—ह्या गोष्टी बोलायला पुष्कळ अवकाश आहे. दादासाहेब किल्ल्या येथेंच टाकून गेले आहेत. माझ्या मनांत कांचनगडचें हें प्रख्यात तळघर पहायाचें फार आहे. चल जाऊं; दादासाहेब येण्यापूर्वीं तळघरांतून जाऊन येऊं.

[ जातात.

## अंक पहिला समाप्त.

# अंक दुसरा.



## प्रवेश पहिला.

**स्थळ**—कांचनगड

( प्रतापराव, दवलतराव व दादासाहेब बसले आहेत. )

**दव०:**—खानाचा वकील वेशीजवळ आला असेल नाहीं ?

**प्रता०:**—दवलतराव, केव्हां एकदां तो वकील येतो आणि पादशहाचे आम्ही कांहीं लागत नाहीं, असें केव्हां त्याच्या तोंडावर सांगतों, असें मला झालें आहे.

**दव०:**—" आमच्यापासून खंडणी मिळणार नाहीं, " यापलीकडे त्याच्याशीं एक अक्षर देखील बोलूं नये; कारण पादशहाशीं तंटा करितांना आमच्याचपैकीं कांहीं सरदारांना चिडविल्यासारखें व्हावयाचें.

**प्रता०:**—वकिलाशीं आम्हांला जास्ती बोलण्याचें काय कारण ? हा वकील जर मुसलमान असतां तर त्याला गडावर चढूं देखील दिलें नसतें. बाकी ह्या आतां येणाऱ्या राघोजीरावांपेक्षां एखादा मुसलमान वकील बरा. याच वृद्ध कपीनें सरदारांना विजापुरास फसवून नेलें आणि सर्वांना सुळावर चढविलें! असा विश्वासघात करून विजयानगरच्या सरदारांचा बीमोड केल्याबद्दल हाच चोर पुढें बाबांच्यापाशीं प्रतिष्ठा मिरवीत होता !

**दव०:**—राघोजीरावासारखा लोचट मनुष्य विजापुरच्या दरबारांत दुसरा कोणी सांपडेल असें मला वाटत नाहीं. मी एकदां त्याला रामराम करावयाला चुकलों, तो जों माझ्या अंगावर गुरकावून आला ! त्याच्यासारखा अभिमानी गृहस्थ पृथ्वीवर दुसरा कोणी नसेल, असें तेव्हां मला वाटलें; पण तिकडून एक दरबारांतला क्षुल्लक नोकर येत होता, त्याच्यापुढें स्वारी किती अदबीनें वांकली ! तुझ्यावर स्वार होऊन बाजारांतून मी हिंडणार, असें जर त्यानें म्हटलें असतें, तर आमच्या राघोजीरावांना स्वर्गसुख अनुभवल्यासारखें वाटलें असतें !

**दादा०:**—राघोजीरावाची आणि माझी अगदीं लहानपणची ओळख. कोणचाही मनुष्य पुढें कसा निपजणार, हें त्याच्या लहानपणच्या लक्षणांवरूनच

समजतें. पादशहाचा वाकनीस ह्यानें पाहिला कीं, मी एखाद्या दिवशीं वाकनीस होईन, म्हणून ह्यानें म्हटलेंच. भालदार—चोपदारांचा तांबडाभडक पोषाख ह्यानें एक दिवस पाहिला, आणि बापाच्यापाशीं मला तसला पोषाख पाहिजे म्हणूनच रडत बसला! जसें बीज तसा अंकूर. ह्याचा बाप म्हणजे काय विचारतां, नबाबसाहेबांचे जोडे उचलावयास सांपडावे म्हणून धांवत सुटावयाचा!

**प्रता०:**—अहो, पूर्वी जाधवांचे राज्य कसें लयास गेलें? काल विजयानगरचा चक्काचूर कसा झाला? तालिकोटच्या लढाईचे वेळीं याच थेरड्या राघोजीरावानें, कां रक्तापिती होऊन परवां मेलेल्या त्याच्या त्या भावानें दारूच्या पोत्यांत राख मिसळली आणि विजयानगरावरून—आमच्या घरांदारांवरून—गाढवांचे नांगर फिरविले! रामराजाचें शीर स्वत: तोडून पादशहाला नजर करणारे हेच चोर आतां दरबारांत मोठ्या पदवीस चढले आहेत! दवलतराव, बाबांनीं अगदीं मरतांना मला जवळ बोलाविलें; आणि तालिकोटच्या लढाईची ही हकीकत सांगितली. विजापुरच्या किल्ल्यांत कोंडून ठेवलेल्या रामराजाच्या बायकापोरांच्या किंकाळ्या मरणसमयीं बाबांना ऐकूं येत होत्या; त्या किंकाळ्या ऐक, म्हणून त्यांनीं मला बजाविलें. तालिकोटचा सूड उगवीन, रामराजाच्या बायकांमुलांना कैदेंतून सोडवून विजापुरास विजयानगरची गादी स्थापीन, असें त्यांना त्या वेळीं मीं पुन्हां वचन दिलें. नंतर पादशहानें विश्वासघातानें मारलेले सरदार तुला आशीर्वाद देण्याकरितां आले आहेत, त्यांच्याकडे पहा, असें म्हणून बाबांची दृष्टि आकाशाकडे वळली. दवलतराव, 'तालिकोट' 'तालिकोट' म्हणून प्राण सोडणारे माझे बाबा ह्या राघ्याला मी गडावर चढूं देत आहें म्हणून रागावले असतील. बाबा, या नराधमाच्या स्पर्शानें कांचनगडचा किल्ला बाटविण्याचा हा शेवटचाच प्रसंग आहे, असें समजा. घरच्या यजमानाला फसवून, पादशहापासून लांच घेऊन दिंडींतून दरवडेखोरांना घरांत सोडणाऱ्या ह्या हरामखोरांना जाळून—पोळून—हाल हाल करून—ठार मारण्याची वेळ आतां खात्रीनें आली. [ जासूद येतो.

**जासू०:**—आली महाराज.

**दव०:**—कोण आली रे?

**जासू०:**—विजापुरची मंडळी.

**दव०:**—हंबीरराव वकिलाला घेऊन आले वाटतें.

**प्रता०:**—येऊं दे त्यांना आंत. [ जासूद जातो.

**दव०:**—राघोजीरावांशीं विनाकारण रागानें बोलण्यांत कांहीं हांशील नाहीं. आपल्याला आपल्या मतलबाशीं गांठ.

**प्रता०:**—मी त्यांच्याशीं एक शब्द देखील बोलणार नाहीं. डावपेचानें कसें बोलावयाचें तें तुम्ही मजकरितां बोला; मग तर झालें दवलतराव ?

**दव०:**—वकिलाला उठून खडी ताजीम दिली पाहिजे.

[ रा० हं० व पि० येतात; व द० व दा० उठतात.

**प्रता०:**—( जाग्यावरून न उठतां ) या हंबीरराव, या पिलाजीराव, या मंडळी बसा. [ राघोजीखेरीज सर्व बसतात.

**राघो०:**—प्रतापराव, आपण दरबारांत वागलेले सरदार, तेव्हां आपणांला पादशहाकडून आज्ञापत्र घेऊन आलेल्या वकिलाचा मानमरातब कसा ठेवावा, हें माहीत नसेल असें मला वाटत नाहीं. पादशहाच्या तक्ताला जो मान द्यावयाचा, तोच मान पादशहाच्या आज्ञापत्राला दिला पाहिजे.

**प्रता०:**—प्रत्यक्ष पादशहा जर कांचनगडावर आला असतां तर त्याला जो मान मी दिला असतां तोच मान मी पादशहाच्या थैलीला देत आहे. ह्यांत काय वावगें झालें ?

**राघो०:**—हंबीरराव, मानें, प्रतापरावांचें हें बोलणें नीट ध्यानांत धरावयाचें. असलें उत्तर ऐकून कांचनगडावर क्षणभरही दुसरा वकील राहताना. माझ्या पांढऱ्या केंसांकडे बघून तरी निदान असें उद्दामपणाचें उत्तर आपण द्यावयाचें नव्हतें.

**प्रता०:**—आपण वयोवृद्ध आहां, ह्याकरितां आपल्या पायावर डोकें ठेवण्यास प्रत्येक तरुणानें तयार असलें पाहिजे; परंतु पादशहाच्या नोकरींत ज्याचे केंस पांढरे झाले आहेत, त्याचा कसला मान ठेवावयाचा !

**राघो०:**—प्रतापराव, पादशहाबद्दल आपणांस इतकी चीड वाटते खरी, पण प्रत्येकानें आपलें बलाबल पाहिलें पाहिजे. पादशहाचें सैन्य, त्याची, अक्कल; यांपैकीं एकाचा लवलेश तरी तुमच्यापाशीं आहे काय ? पादशहाचें राज्य विजयानगरास होण्यापूर्वी काय तुम्हां सरदारांची स्थिति होती ? जाधवांनीं मान्यांचा अपमान करावा, मान्यांनीं भोसल्यांचा सूड उगविण्यांत गुंग असावें, चोहोंकडे फाटाफूट व दंगेधोपे ! अहो, हा पादशाही अंमल विजयानगरास सुरू झाला व लुटारू रामराजासारख्या चुंगुरख्यांना त्यानें चिरडून टाकिलें, म्हणून शांतपणानें भाकरीचे दोन तुकडे खावयास तरी मिळतात ! प्रतापराव, मी वयोवृद्ध आहे,



प्रता०——बंड? कोण कोणाविरुद्ध बंड करितो?

[ पृ० २७

तेव्हां तुम्हांला दोन गोष्टी समजून सांगण्याचा मला अधिकार आहे. तुमच्या राजकर्त्यांच्या राहणीचा कित्ता गिरविण्याचा प्रयत्न करा, त्यापासून तुमचें कोटकल्याण होईल. पादशहाप्रमाणें तुमच्या बायकांना पूर्ण गोषांत ठेवावयाला शिका, त्या शुद्ध राहतील; तुमचें बीज बिघडणार नाहीं. पादशहाचे दरबारांत राहून पुष्कळ शिकण्यासारखें आहे. पादशहाची प्रीति संपादून जें कांहीं मिळेल तें मिळवावें, ह्यांतच सुख आहे. आपल्या हाताशेजारचाच पदार्थ मिळविण्याविषयीं खटपट करावी, लांब दूरवर नजर फेंकण्याची आमची योग्यता नाहीं.

**प्रता०:**—हरामखोरा, विश्वासघातानें विजयानगरास सुळावर चढविणाऱ्या मात्रागमन्या नरपशो, कोणाला हें ब्रह्मज्ञान शिकवितोस? हातांत कांकणें भरून बायका झाले असतील त्यांनीं हातांतील कांकणाकडे पहात उभें राहावें. दूरवर नजर फेंकण्याची आम्हां जाधवांची योग्यता नाहीं काय? जनानखान्यांत कोंडलेल्या बायकांचें कौतुक करण्यांत ज्यांचें आयुष्य गेलें त्यांच्या डोळ्यांना लांबवर नजर फेंकण्याची शक्ति नसेल, परंतु विजयानगरच्या वीरांनीं ह्या चोरांच्या लक्षावधि सैन्याला रणांगणावर 'दे माय धरणी ठाय' करावयास लाविलेलें, ज्यांच्या दृष्टीला अद्याप स्पष्ट दिसत आहे, पादशाही राज्यावर हल्ले करून विजयानगरास गोळा केलेल्या वैभवाची लकाकी ज्यांचे डोळे अद्याप विसरले नाहींत, त्या सरदारांच्यापुढें, जाधव कुळांतल्या पुरुषापुढें, जाधवांच्या गडावर उभें राहून, पादशहाच्या मर्दुमकीची स्तुति करावयाला तुम्हांला लाज तरी कशी वाटत नाहीं? पादशहाच्या बायकांचे पोवाडे गाऊन आमच्या बायकांची नालस्ती करूं पाहतां अं! तुमचा पादशहा, धिप्पाड शरिराचे तुमचे खान, नबाब, अमीर, उमराव, ह्यांच्या या थैलीला मी कस्पटाप्रमाणें लेखतों. (थैली घेऊन फाडून टाकतो.) जा, विजापुराला जा; आमच्या देशाच्या पैशावर चैन करणाऱ्या तुमच्या पादशहाला माझा साफ निरोप सांगा, प्रतापराव कांचनगडावर तुमचा अधिकार मानीत नाहीं!

**राघो०:**—प्रतापराव, राघोजीरावाचा तुम्हीं अपमान केला आहे, पादशहाच्या विरुद्ध बंड करितां—

**प्रता०:**—बंड? कोण कोणाविरुद्ध बंड करितो? पादशहानेंच आमच्याविरुद्ध इतकीं वर्षें एकसारखी बंडफितुरी केली; आतां त्याला शिक्षा करण्याची वेळ आली आहे; बंडखोरांना तुम्ही सामील झालेले, कसला तुमचा मान ठेवावयाचा?

**पिला० हंबी० व दादा०:**—प्रतापराव, जरा शांत व्हा, राघोजीरावांचे वयाकडे पहा—

**प्रता०:**—यांचे वयाकडे पहातांना तालिकोटास यांनीं उभारलेल्या पापाच्या पर्वताकडे नको का पहावयाला ? तालिकोटची आठवण झाली कीं, पायाची आग मस्तकाला जाते. माझ्या डोळ्यासमोर हा मात्रागमनी क्षणभरहि नको. चला, निघा, आतां एकदम कांचनगडावरून चालते व्हा. चला, निघा. चोर, दगलबाज ! पादशहाचे देव्हारे माजविणारे लोक कांचनगडावर जर क्षणभर राहिले तर सर्व गड कुजून नासून जाईल ! व्हा चालते एकदम ! ( पिला० हंबी० व राघोजी जातात. ) पादशहाच्या ताटाखालचीं मांजरें आम्ही यापुढें नसून, आमचे आम्ही पूर्ण स्वतंत्र झालों. दवलतराव, विजयानगरचा झेंडा कांचनगडावर उभारा-गुलामगिरी संपली, अपमानाच्या दु:खाचा शेवट झाला !

**दव०:**—प्रतापराव, आजच्या ह्या कृत्यानें आतांपासून आपण प्रत्यक्ष लढाईस सुरवात केली ! सूर्याजीराव मोहिते व कटांतील इतर सरदार ह्यांना आतांच्या आतांच सर्व पत्रें लिहून स्वामीमहाराजांपाशीं मला दिलीं पाहिजेत.

**प्रता०**:—गुरुमहाराजांपाशीं पत्र देतांना त्यांच्याजवळ जयाबद्दल आशीर्वाद मागा. माझ्या शहाजीला त्यांनीं आशीर्वाद दिला आहे; तुमच्याहि शिरावर त्यांचा आशीर्वाद असूं द्या. जा, महाराजांकडे जाऊन पत्रांचें सर्व काम आटपून लवकर परत या. [ दवलतराव व दादासाहेब जातात.

**प्रता०**:—( स्वगत ) काय असेल तें असो; आज माझ्या मनाला जो आनंद वाटतो आहे, तसा आनंद पूर्वीं कधींहि वाटला नव्हता. पूर्वीं जाधवांचें राज्य बुडालें, पण जाधवांचें कूळ कायम राहिलें; आज ज्या युद्धामुळें कदाचित् जाधवांच्या घराण्याचीं पाळेंमुळें पादशहा खणून काढील, त्या युद्धाचा भार मी आपल्या शिरावर घेतला आहे. अशा वेळीं माझ्या हृदयाला तळमळ लागून रहावयास पाहिजे होती; परंतु कालच्याहून आज मी अधिक सुखी आहे, असेंच मला वाटतें. विजापुरकरांनीं विजयानगरचें राज्य बुडविल्यानंतर पादशहाचे गुलाम होऊन सरदारकीचीं सुखें भोगण्यापेक्षां तरवारीच्या तीक्ष्ण धारेवर चालत जाऊन सूड उगविण्याचा प्रयत्न करणें जाधव कुळांतील पुरुषाला अधिक प्रियच वाटलें पाहिजे. समरांगणावर मरण येऊन सर्व घराण्याचा नायनाट झालेला पत्करला; पण तुमच्या अधिकाराचें जड जूं आम्ही असें फेंकून देतों म्हणून पादशहाला सांगण्याचा प्रसंग विजयानगरच्या सरदारांनीं आनंदाचाच मानला पाहिजे.

[ पडदा.

## प्रवेश दुसरा.



स्थळ:—कांचनगड.

( हंबीरराव येतो. )

**हंबी०:**—कांचनगडचे लोक फार शहाणे असतील असें मला वाटलें होतें; पण येथील प्रत्येक मनुष्य मला राघोजीरावासारखा मूर्ख दिसतो! इतर देवांच्या मूर्ति देवळांतून हाकलून लावून मोहनेच्या प्रतिमा कां हे लोक देवळांत बसवीत नाहींत कोण जाणें! राघोजीराव पादशहाच्या स्त्रियांची तेवढी स्तुति करतो, आणि मोहनेविषयीं एक अक्षरही बोलत नाहीं, असें पाहण्याबरोबर प्रतापरावांनीं त्याला ठार करावयास पाहिजे होतें. मोहनेसारखी स्त्री मिळाली असतांना, आनंदानें दिवस काढण्याचे सोडून ही बडाची उठाठेव करायला या प्रतापरावाला सांगितलें आहे कोणी? खुळे, सर्व खुळे! विजयानगरची गादी जर पुन्हां स्थापावयाची होती, तर मोहनेच्या तोंडून तसा हुकूम आम्हां सरदारांना फरमावयाचा होता; हजारों तरुण वीरांच्या तरवारी म्यानांतून एकदम बाहेर झळकल्या असत्या! मोहनेच्या एका शब्दांत जो पराक्रम आहे —अरे दवलतराव व पिलाजीराव आले! मोहनेसंबंधानें इतका वेळ विचार करीत असल्यामुळें आनंदसागरांत पोहत असल्यासारखे वाटत होते; पुन्हां आतां मला ह्या मूर्ख मंडळीच्या रडकथा ऐकिल्या पाहिजेत. [ दव० व पिला० येतात.

**दव०:**—काय हंबीरराव, सरकारवाड्याजवळ तुम्हांला गाठूं इतके तुम्ही पुढें गेला असाल, असें पिलाजीराव म्हणत होते; पण तुम्ही अजून येथेंच!

**हंबी०:**—विचार करीत करीत चाललों होतो सावकाश झालें.

**दव०:**—राघोजीराव कसा काय मनुष्य आहेसें तुम्हांला वाटतें?

**हंबी०:**—पुरा आचरट आणखी काय? दरबारचीं हीं म्हातारीं अशींच असावयाची!

**पिला०:**—काय ह्या म्हाताऱ्यांना वाटतें ईश्वराला माहीत, तरुण मंडळी दृष्टीस पडलीं कीं, म्हातारपणाचा अधिकार सांगून, हे आपले उपदेश करावयाला लागलेंच! राघोजीरावानें प्रतापरावांना शिकविण्याचा आव घातला नसता, तर तेहि रागावले नसते.

**दव०:**—रागावले असते किंवा नसते त्याचा कांहीं नेम नाहीं. पादशहाचा अधिकार केव्हां झुगारून देईन असें त्यांना झालें होतें, झाला हा प्रकार असाच व्हावयाचा. तुम्हांला काय वाटतें हंबीरराव ?

**पिला०:**—आतां मी तुम्हांला सांगितलें नाहीं का ? असें केव्हां तरी व्हावयाला पाहिजेच होतें. अरे ! आम्ही अगदीं दादासाहेब कोठाऱ्यांच्या घराजवळ आलों. दवलतराव, मला दादासाहेबांच्याकडे गेलेंच पाहिजे. खुद्द दादासाहेबांचा आणि आमच्या वडिलांचा अतिशय घरोबा, सख्या भावाप्रमाणें एकमेकावर प्रेम; शिवाय दादासाहेबांचे कुटुंब विजापुरचें, आमच्या नात्यापैकींच. हंबीरराव, मीं मग येईन सरकारवाड्याकडे. ( हंबीररावास एकीकडे ) मी जरा मुद्दाम म्हणून उशीर करीन; आणि तोंपर्यंत प्रतापरावांना नक्की बेत कांहींच कळवायचे नाहींत. ( उघड ) बरें दवलतराव, मी तुमच्याबरोबर वाड्यापर्यंत येणार होतों, पण आतां काय हंबीररावाची गांठ पडली, मी येतों लवकरच. [ द० व हं० जातात. (स्वगत ) विजापुरांस असतांना जर कोणी मला विचारलें असतें, हंबीरराव शहाणे आहेत का ? तर मीं उत्तर दिलें असतें, हंबीरराव मूर्ख काहीं नाहींत. आतां मात्र मी खात्रीनें म्हणूं शकतों, कीं हंबीररावासारखा दुसरा मूर्ख सांपडावयाचा नाहीं ! परवां मोहना त्यांच्याशीं दोन शब्द कोठें बोलली, तेव्हांपासून तर यांना मोहनेचें पक्कें खूळ लागलें आहे. मोहनेमुळें हा पुरा वेडा झाला तर मला पाहिजेच आहे म्हणा ! विजापुरच्या दरबारांतल्या माझ्या मोठेपणाच्या वाटेंतला हा कांटा परस्पर मोहनेनें काढून टाकला तर माझें आयतेंच कल्याण होईल ! प्रतापरावाचें शिर पादशहास नजर करून मोठी जहागीर मिळविण्याच्या वेळीं तेथें हंबीरराव मला बिलकूल नको. असो; माझा मतलब साधण्याकरितां प्रथम मला लक्ष्मी आपलीशी केली पाहिजे. ही छिनाल लक्ष्मी मुठींत सांपडल्यावर कांचनगडच्या चिंध्या चिंध्या करायला काय उशीर ! बरें; कांचनगड आम्हीं धुळीला मिळविला, आणि बक्षीस मात्र खानानें पादशहाकडून उपटलें तर ? आम्हीच हेऊन खानाची कत्तल केली तर कसें ? पण कोणी तरी आरब जिवंत उरणार; शिवाय माझेच लोक पादशहाशीं चुगली केल्याशिवाय कोठले रहायला ! छे ! पिलाजीराव, पादशहाची वजिरी संपादण्याचा हा मार्ग नव्हे. कसें बरें ? प्रतापरावानेंच खानाला लोळविलें पाहिजे, एरवीं बस्तान बसत नाहीं. अरे, मीं दादासाहेबांच्या वाड्यांत तर आलों ! ह्या चौकांत कोणी दिसत नाहीं ! गण्या, गण्या, दादासाहेब आहेत का रे आंत ? ( पडद्यांत—सरकारवाड्याकडे गेले



पिलां०—तुझ्या इच्छेप्रमाणें लवकर घडून येईल; परंतु- [पृ. ३१

आहेत. ) वहिनीसाहेब काय करीत आहेत? (पडद्यांत—तुळशीकट्ट्याकडे आहेत; असे समोर जा. )

[ पडदा वर जातो. लक्ष्मी तुळशीची पूजा करीत बसली आहे. पिलाजीराव मागें जाऊन उभा राहतो. ]

**लक्ष्मीः**--भगवंता परमेश्वरा, कांचनगडावरील ह्या कैदखान्यांतून ह्या गरीब अबलेला लवकर सोडीव.

**पिला०:**--तुझ्या इच्छेप्रमाणें लवकर घडून येईल; परंतु--

**लक्ष्मीः**--( उठून ) कोण तें ? पिलाजीराव ? खरोखरच तुम्ही देवाप्रमाणें आलां, आणि माझ्या इच्छेप्रमाणें घडवून आणणें तुमच्या ताब्यांतही आहे.

**पिला०:**—हो, माझ्या ताब्यांत आहे म्हणजे काय ? माझी इच्छा आहे, शक्ति नाहीं; म्हणूनच मीं आशीर्वाद देतांना ‘ परंतु ’ म्हणून ठेविलें आहे.

**लक्ष्मीः**--पिलाजीराव, मी तुळशीपुढें उभी आहे, अगदीं खरें खरें सांगतें. तुम्ही जेव्हां ‘ तुझ्या इच्छेप्रमाणें लवकरच घडून येईल ’ म्हणून म्हटलें, तेव्हां माझ्या नवसाला देव पावला, असेंच खरोखर मला वाटलें.

**पिला०:**—नवसाला देव पावो अगर न पावो, उद्यां संध्याकाळीं किंवा परवां सकाळीं विजापुराकडे जाण्याचा मीं विचार केला आहे.

**लक्ष्मीः**--म्हणजे ? तुम्ही आपली माझी थट्टा करतां झालें ! इतक्यांत लढाईला प्रारंभ होईल, अशी तर गुप्त बातमी आज सकाळीं मला कळली.

**पिला०:**—या कारस्थानाची बातमी दादासाहेबांनीं आपणांस ताबडतोब दिली वाटतें ! तुम्हांला दरबारच्या बातम्या सांगतात, तेव्हां दादासाहेबांचें आपल्यावर फार प्रेम आहे. मग तुम्ही कसच्या विजापुरला येणार ?

**लक्ष्मीः**—ज्यांच्यावर माझें प्रेम आहे, त्यांच्याबरोबर मी येतें म्हणतें. ह्यांत काय वावगें आहे ? माझी आपली वेडी समजूत होती, तुम्ही आणि हंबिरराव गडावर रहावयाला याल, आणि मग लढाई संपल्यावर--

**पिला०:**—आपापल्या गांवीं निघून जाल—

**लक्ष्मीः**—मला बरोबर घेऊन.

**पिला०:**--पंचाईत आहे ती येथेंच. तुला नेण्याकारितां तर विजापूर सोडून मी येथें आलों. पण कालपासून ज्या गोष्टी घडून आल्या, त्यामुळें तुला येथून नेणें दुरापास्त झालें आहे.

**लक्ष्मीः**—तें कां ? आतांच कसें दुरापास्त झालें ?

**पिला०**:—तें कसें झालें, हें तुला सांगावयाचें म्हणजे माझ्या मनांतील सर्व गुप्त बेत तुला सांगितलें पाहिजेत; पण दादासाहेबांप्रमाणें एकदम बायकांवर विश्वास टाकावा, असें ह्या पिलाजीरावास वाटत नाहीं.

**लक्ष्मी**:—ह्या तुळशीवृंदावनांतील बाळकृष्णाचे पायांवर हात मारून मी शपथ वाहतें, आपण जें मला सांगाल तें कोणापाशींहि बोलणार नाहीं. पिलाजीराव, सुखाची आशा दाखवून दुःखाचे डोहांत लोटून देण्याइतके कठोर होऊं नका.

**पिला०**:—सुखाची आशा मीं दाखविली खरी; पण आतां दुःख कसें आलें तें ऐक. प्रतापराव खंडणी देण्यास नाकबूल आहे, ही गुणगुण आम्हांस विजापुरींच समजली होती. कांचनगडास आल्यावर लढाई होणार हें मला पूर्वींच स्वप्न पडलें होतें. कांचनगड आम्ही सर करूं, मग कांचनगडावरील लक्ष्मी माझी झालीच पाहिजे, असा माझा त्या वेळीं अंदाज होता; पण आतां सर्वच पारडें फिरलें. हंबीरराव प्रतापरावांना मिळाले; मी खानाचा पक्ष सोडला नाहीं, तरी माझ्या हाताखालचे लोक हंबीररावाचे विरुद्ध लढण्यास केव्हांहि तयार व्हावयाचे नाहींत. तेव्हां या लढाईंत खानाचा आपला पराभव व्हावयाचाच.

**लक्ष्मी**:—आपणहि हंबीररावांबरोबर कांचनगडावर यायचें होतें.

**पिला०**:—तसें केलें तरी तुला येथून पळवून नेणेंच अशक्य आहे. शत्रूचा गड, तूं ब-याच मोठ्या हुद्देदाराची बायको, तुझ्या देवडीवर नोकर, कशी तुला पळवून न्यावयाची ? तेव्हां मीं विचार केला, ह्या वेळीं एकदम विजापूरला जावें आणि व्यूहाची बातमी पादशहाला द्यावी.

**लक्ष्मी**:—आणि माझी सर्व आशा नाहींशी करणार ना ? ( जवळ जाते. पि० दूर होतो. ) येथें कोणी यायचें नाहीं. तुम्ही आलां म्हणजे तुळशीकट्ट्याकडे तुम्हांला पाठवून द्या, इकडे कोणी येऊं नका, अशी माझी सक्त ताकीद आहे; शिवाय सर्व चाकरमाणसें माझ्या विश्वासाचीं आहेत. पिलाजीराव, कसेंहि करा आणि मला आपणांबरोबर विजापूरला न्याच. उद्यां रात्रीं काळोखांत तुम्हीं मला नेलें तर ?

**पिला०**:—न्यायची कशी ? रात्रीचा दादासाहेबांचा तुझ्यावर पहारा, तुझ्या घराबाहेर पहारा, शिवाय गडाच्या वेशीचा दरवाजा बंद. तीन अडचणी आहेत.

**लक्ष्मी**:—तीन कांहीं ख-या नाहींत, एक खरी. दादासाहेबांना थोडीशी जास्ती दारू झाली म्हणजे गाढ झोंप येते; शिवाय दारावरचे पहारेकरी निशा करीत नाहींत, असें कांहीं नाहीं.

**पिला०**:—मीं असा विचारच केला नव्हता. कसें म्हणतेस ? हो, आहे खरें साधण्याजोगें. पाहूं बरें विचार करून. ठीक; दादासाहेबांनीं मला उद्यांच रात्रीच्या मेजवानीला बोलाविलें आहे नव्हे ?

**लक्ष्मी**:—होय, जरा जास्ती प्यायला लावा म्हणजे झालें.

**पिला०**:—उद्यां मेजवानीच्या वेळेला मी सांगेन तसें जर करायला तयार असशील,—

**लक्ष्मी**:—अगदीं जसें सांगाल तसें. पिलाजीराव, बायका निश्चयी व साहसी असतात. तुम्ही सांगाल त्यांत काडीभरहि चूक व्हावयाचा नाहा.

**पिला०**:—लक्ष्मी, माझ्या मनांत आतां एक अशी युक्ति आली आहे, कीं, ती जर साधली, तर विजापुरास असतांना ज्या गोष्टी घडून येतीलसें वाटत होतें, त्या सर्व अजून घडून येतील. तूं जर मी सांगेन तसें ऐकशील, तर अजून कांचनगडावरील सर्व सरदारांना विजापूरच्या कैदखान्यांत अडकवीन, तुला बरोबर घेऊन मोठ्या थाटानें विजापुरांत प्रवेश करीन, आणि बादशहाला तुझ्या नांवाची मोठी जहागीर तोडून द्यावयास लावीन. लक्ष्मी, दादासाहेबांचें कांहीं झालें तरी होऊं द्या, असें म्हणण्यास तयार आहेस ना ?

**लक्ष्मी**:—पिलाजीराव, आपणांशिवाय जगांत कोणाचें कांहीं झालें तरी मला त्याची कांहीं काळजी नाहीं. तुळशिवर हात ठेवून मी सांगतें, कीं आपण जसें सांगाल तसें वागण्यास मी तयार आहे.

**पिला०**:—बरें, उद्यांचा बेत मी सांगेन तसा ठेवला पाहिजे. सरकारवाड्याकडे जाऊन येऊन तुला काय तें सांगतों. [ पडदा.

---

## प्रवेश तिसरा.



**स्थळ**—कांचनगडावरील बाग.

[ मोहना व चंपा येतात. ]

**मोह०**:—स्वामीमहाराज केव्हां ग सोनगडाला जाणार आहेत ?

**चंपा**:—आतां इतक्यांत निघाले देखील असतील. नानासाहेबांना देण्याकरितां मीं तलवार आनंदापाशीं दिली त्याच्या पूर्वीच दौलतरावांनीं सर्व पत्रें महाराजांपाशीं दिलीं होतीं.

**मोह०**:—तलवार आनंदापाशीं दिलीस, त्या वेळीं बाबांना सांगायचा माझा निरोप सांगितलास ना ?

**चंपा**:—हो, आनंदाला मी सांगितलें, बाबासाहेबांना सांगा, छोटे सरकारांच्या हातांत ही तलवार खेळायला दिली म्हणजे नजर चुकवून इकडेतिकडे त्यांना जाऊं देऊं नका म्हणून.

**मोह०**:—अगदीं बजावून असें सांगितलेंस ना ? काय बाई त्या दिवशीं त्यानें केलें ! अगदींच हट्ट धरून बसला, म्हणून त्याच्या हातांत जरा ती तलवार दिली. कशी गुलामानें माझी नजर चुकावली ! किती हुडकला कांहीं केल्या सांपडेना ! ह्या येथेंच येऊन बसला होता नाहीं चंपे ? ह्याच पारिजातकाच्या फांद्या त्यानें तलवारीनें त्या दिवशीं तोडल्या; छे छे बाई ! काय उच्छाद करीत असे ! आतां त्याला ती तलवार झेपेल नाहीं ?

**चंपाः**—हो, आतां छोटे सरकार तेवढे मोठे नाहीं कां झाले ?

**मोह०**:—हो अगदीं ठीक होईल. सोनगडाहून जेव्हां मी परवां आलें, तेव्हां मला कितीदां बजावून सांगितलें, तेवढी माझी तलवार मला पाठवून दे म्हणून. चंपे, मामंजींची ती लहानपणची तलवार आहे. माझ्या मनांतून दसऱ्याचे मुहूर्तानें तिकडून शहाजीचे हातांत द्यावयाची होती. वडिलोपार्जित तलवारबहाद्दरीच्या धंद्याचा श्रीग गिरवितांना त्याच्या त्या प्रारंभींच्या लीला पाहण्याचें या मोहनेच्या नशिबीं नाहीं; आणि तलवार कशी धरावी हा पहिल्या दिवशींचा धडा स्वारीपासून शिकण्याचें त्याच्याहि नशिबीं नाहीं.

**चंपा**:—मग बाईसाहेब, दसऱ्यापर्यंत वाट कां नाहीं पाहिली ? आजचें कशाला ती तलवार पाठवून दिली ?

**मोह०**:—आजच कां पाठवून दिली, कांहींच सांगतां येत नाहीं. माझ्या मनाला वाटलें झालें ! ही लढाई सुरू होणार आणि लढाईंत बरेंवाईट काय होतें कोणाला माहीत ! दसरा कोणी बघितला आहे बाई ! वाटलें आपलें, द्यावी झालें आजच तलवार पाठवून. त्याच्या सरदारीच्या बाण्याचा आरंभ पाहण्याचें माझ्या नशिबीं कदाचित् नसेल; पण आईनें माझी एवढीदेखील हौस पुरविली नाहीं, असें नको व्हायला. चंपे, या लढाईचा मी विचार करूं लागलें म्हणजे माझ्या मनाला किनई कसेसेंच वाटतें बाई !

**चंपा**:—असें कां बरें बाईसाहेब ? एकटा मेला तो खान काय करणार आहे?

**मोह०**:—मला असें कां वाटतें, हेंच समजत नाहीं. पण वाटतें खरें. स्वारीच्या उतावीळपणाला आळा घालणारें कोणी आहे कां येथें? बाबा ह्या वेळीं येथें असते म्हणजे बरें झालें असतें. स्वामीमहाराज निघून गेले, बाबांना असाल तसे निघून या म्हणून निरोप पाठवायचा होता माझ्या मनांतून, आणि हें पत्र बाबांना देण्याकरितां लिहून देखील ठेविलें होतें.

**चंपाः**—मग बाईसाहेब, मजपाशीं कां दिलें नाहीं? मीं आनंदापाशीं किंवा स्वामीमहाराजापाशीं दिलें असतें.

**मोह०**:—देणार होतें; पण म्हटलें लढाईच्या कारस्थानांत बायकांनीं ढवळाढवळ करणें चांगलें नाहीं; शिवाय बाबांना दवलतरावांनीं लिहिलेल्या पत्रांत सैन्यानिशीं लवकर या, असें लिहिलेंच आहे; तेव्हां, असाल तसे लवकर या म्हणून लिहिणें जरा गैरच नव्हे का?

**चंपा**:—गैर कसलें बाईसाहेब? दोन्हीं पत्रें त्यांना पोंचतील, आणि मग त्यांना योग्य वाटेल तें ते करतील.

**मोह०**:—असें एकदां मनाला वाटतें. पण आतां काय त्याचें? स्वामीमहाराज गेले देखील असतील. ( पडद्यांत–' नारायण, नारायण, नारायण.' ) कोण ग? ह्या कठड्यापलीकडून आवाज ऐकूं येत आहे, पाहूं चल.—हे पहा स्वामीमहाराज नुक्ते वेशीच्या बाहेर पडून गड उतरूं लागले आहेत.

**चंपा**:—मजपाशीं पत्र द्याल, तर आतां इतक्यांत मी त्यांना गांठीन; ते कांहीं जलदीनें जात नाहीं आहेत.

**मोह०**:—घे हें पत्र. ( पत्र देते. ) आणि हा हारहि घे. ( हार देते. ) स्वामीमहाराजांच्या चरणावर हा हार ठेव, व त्यांना विनंति कर–म्हणावें, एवढें पत्र बाबांना द्यायला मोहनेनें दिलें आहे. कसें पण लीनतेनें त्यांना सर्व सांगशील; जा लवकर, झटपट पाय उचल. [ चंपा जाते.

**मोह०**:—( स्वगत ) ह्या लढाईचा परिणाम चांगला होणार नाहीं, असें कां बरें वाटावें? असें वाटतें एवढें खास; पण माझें मला कारण कांहीं सांगतां येत नाहीं. कांचनगडच्या पायथ्याला विजापूरच्या सैन्याचा तळ पडला, व हंबीरराव ह्या सैन्यांतले मुख्य सरदार आहेत असें ऐकिलें, त्या वेळीं माझ्या पोटांत धस्स झालें होतें! विजापूरची पादशाही बुडवावी, असें इकडच्याप्रमाणें हंबीररावांच्याहि मनांत नसेल कशावरून? पण यमुनेशीं हंबीररावांची अशी वर्तणूक कां? हिरव्या महालांत मला धरायला धांवले, त्या वेळेसारखा पोषाख हंबीरराव इतक्या

भक्तीनें कां वापरतात ? तो हिरवा पोषाख पाहून परवां मी दचकलें. अग बाई ! हें काय मी पहात आहें ! हंबीरराव येथें कसे आले ? आणि परवांच्याच हिरव्या पोषाखांत मजकडेच येत आहेत ! परवां यमुना तरी जवळ होती. आतां करावें तरी काय बाई ! त्यांना पाहिलेंच नाहीं असें करून ह्या वेलीच्या आडून फुलझाडांतून निघून जावें. ( जाऊं लागते. ) हा काय बाई चमत्कार ! मी ह्या बाजूला वळलेली पाहून तेहि ह्याच बाजूला वळले ! ह्यांना चुकवून जाण्याची कांहीं आतां सोय नाहीं. [ हंबीरराव येतो.

**हंबी०:**—( जवळ येऊन ) मोहने, तुझी एकटीची गांठ घेण्याचा प्रयत्न करतां करतां आज तो योग जुळून आला. भिऊन दूर जाण्याचें कांहीं कारण नाहीं. मोऱ्यांच्या वाड्यांतील हिरव्या महालांत तुझीं आर्जवें करून तुला भिवविणाऱ्या हंबीररावांत व आजच्या हंबीररावांत पुष्कळ अंतर आहे.

**मोह०:**—त्या दिवशींची मजविषयींची पापबुद्धि तुमच्या मनांत नसल्यावर वहिनीला भाऊजींचें भय वाटण्याचें कांहीं कारण नाहीं.

**हंबी०:**—निष्कपट, निर्मळ प्रेमाला जर पापबुद्धि हें नांव मिळालें. तर प्रेम ही स्वर्गीय वस्तु आहे असें म्हणतात तें खोटेंच म्हणावें लागेल ! मोहने, माझी भीति—

**मोह०:**—कांचनगडावर असतांना जाधवकुळांतील बायकांना कोणाचीहि भीति बाळगण्याचें कारण नाहीं.

**हंबी०:**—कांचनगडावर असो किंवा नसो, पण मोहनेला हंबीररावापासून केव्हांहि भीति बाळगण्याचें कारण नाहीं. आराध्यदेवता आपल्या भक्तांच्या पूजेची केव्हांहि भीति बाळगीत नाहीं.

**मोह०:**—हंबीरराव, हे शब्द कोणापुढें उच्चारीत आहां ? विजापुरच्या पादशहाचेविरुद्ध जो सरदारांचा कट झाला आहे, व ज्या कटांत तुम्ही सामील आहांत, त्या कटाचे मुख्य सरदाराचे बायकोपुढें असले शब्द उच्चारतां काय ? हें पाप—

**हंबी०:**— लोकदृष्टीनें मी पाप करित असेन; पण असें बोलूं नको तर मग करूं तरी काय ? आज सहा वर्षें झालीं, पादशहानें कोणच्या तरी स्वारीवर जा, म्हणून माझी नाहीं नाहीं तीं आर्जवें केलीं असतील; पण लढाईला जाण्याचा हुकूम झाला कीं, ज्या हंबीररावांना आनंदाची भरती येत असे, रणांगण ज्यास रंगमहालाहून अधिक प्रिय वाटे, त्याच हंबीररावानें आज सहा वर्षांत म्यानांतून तलवार कशी ती बाहेर काढिली नाहीं ! मोहने, तुला पाहायला सांपडेल,



हंबी [illegible] दिवसापासून आजपावेतों हंबीररावानें तिला मातेप्रमाणें पाळिलें आहे.

[ पृ. २७

तुझ्याशीं दोन गोड शब्द बोलायला मिळतील, एवढ्याचकरितां कांचनगडची कामगिरी मीं पतकरली, एवढ्याचकरितां जाधवांचे कटांत सामील झालों !

**मोह०:**—तर मग जाधवांचे कटांत साधूचें रूप घेतलेले आपल्यासारखे काळसर्प आहेत म्हणायचे !

**हंबी०:**—जाधवांचे कटांत मला काळसर्प करणें, किंवा साधु करणें, तुजवर अवलंबून आहे. तुमच्यावर दया करावीशी वाटतें, असे अमृताचे शब्द बोल, आणि तुझ्या बंद्याला हुकूम कर. मोहने, सहा वर्षांपूर्वी हंबीररावाच्या अंगांत जें शौर्य खेळत होतें, तें सर्व उसळीसरसें दिसूं लागेल; म्यानांतून तलवार इतक्या जोरानें बाहेर पडेल कीं, त्या झटक्यासरशीं शेंकडों वर्षांचा तिचा गंज नाहींसा होईल. माझे गुण हिऱ्याप्रमाणें चमकाविणें, मोहने, तुझ्या स्वाधीन आहे; किंवा मला गारगोटीप्रमाणें कवडीमोल करून टाकणें, हेंहि तुझ्या हातीं आहे.

**मोह०:**—हंबीरराव, मोहना म्हणजे विजापुरच्या बाजारांतील एखादी स्त्री आहे असें तुम्हांला वाटतें काय? हंबीरराव, मला तुमचें भयहि वाटत नाहीं, आणि कितीहि घाणेरडें बोललां तरी मी त्याची पर्वाहि करीत नाहीं, माझें तुम्हांला सांगणें इतकेंच आहे, तुमची बायको यमुना सद्गुणी आहे, रूपवानहि आहे; तिचें प्रेम संपादण्याचा जर तुम्हीं प्रयत्न केला, तिला आनंदी करण्याचा जर नाद धरला, तर गारगोटीप्रमाणें कवडीमोल होण्याचें कांहीं कारण नाहीं. तुम्हीच विजापुरची पादशाही बुडवाल, तुम्हीच विजयानगरचे राजपुत्रांना पुन्हां तख्तावर बसवाल, तुमच्या धर्माला लागलेली काळोखी तुम्हीच पुसून काढाल, तुमची कीर्ति हिऱ्याच्या तेजाप्रमाणें चोहोंकडे फांकेल, व यमुनेचे मुलगे सवाई हंबीरराव होऊन तुमचें नांव अजरामर होईल.

**हंबी०:**—नाहीं, मोहने, नाहीं; ह्यांपैकीं कोणचीच गोष्ट घडून येणें शक्य नाहीं. यमुनेशीं लग्न लाविल्यानें तुझें वेड कमी होईल, असें मला त्या वेळीं वाटलें; पण लग्नाच्या अक्षता माझ्या मस्तकावर पडल्या असतील नसतील, तों माझा मला पश्चात्ताप झाला. यमुना तुझी मैत्रीण आहे, यमुना सद्गुणी आहे, रूपवान् आहे, हें सर्व मी कबूल करतों; पण लग्न झाल्या दिवसापासून आजपावेतों हंबीररावानें तिला मातेप्रमाणेंच पाळिलें आहे. मोहने, यमुनेनें आज सहा वर्षें जीं दुःखें सोसलीं व ह्या दुःखांत ज्या सद्गुणानें तिनें दिवस काढले, त्याचा जर विचार केला, तर देवलोकांतहि तिची योग्यता सर्व स्त्रियांहून कांकणभर जास्तच ठरेल. पण मी तरी काय करूं? माझा नाइलाज आहे. तुझ्याच चरणीं

मी सर्व प्रेम कां अर्पण करितों व यमुनेशीं बोलावयाला मजपाशीं प्रेमाचा एकहि शब्द कां नाहीं, ह्याचें कारण मी काय सांगूं? दरबारांतील माझी पदवी मला जड वाटते, धर्मसेवा मला तुच्छ वाटते,—

**मोह०**:—हंबीरराव, तुम्ही कोठें आहां, काय आहां, याची तुम्हांला शुद्ध आहे का? वेड्यासारखें असें काय बरळतां?

**हंबी०**:—माझा वेडेपणा मला दुसऱ्यांनीं दाखविण्याची जरूरी नाहीं. मोहने, तुझ्या प्रेमानें मी खरोखरीच वेडा झालों आहें. तुझ्या मोहक मूर्ती शिवाय इतर वस्तु जेव्हां मी डोळ्यापुढें मांडतों, तुझ्या प्रेमाच्या धुंदींतून मनाला जागें करून जेव्हां इतर गोष्टींचा विचार करूं लागतों, त्या वेळीं मोहने, झंझावात सुटला असतां दर्याची जी स्थिति होते, तशी माझ्या मनाची अवस्था होते. माझ्या अंतरात्म्याचा मुख्य आधार काढून घेतल्यामुळें जीव व्याकूळ होऊन शरीर कोसळून पडतें आहेसें वाटतें!

**मोह०**:—हंबीरराव, मला जाऊं द्या. माझी वाट सोडून दूर व्हा. भलत्या वेडेचारांत सुख मानण्यापेक्षां ईश्वरभजनीं जर वेळ घालविला असता,—

**हंबी०**:—माझा परमेश्वर तूं! तुझ्या भजनीं लागल्यानेंच पुण्याची जोड—

**मोह०**:—हंबीरराव, वाट सोडा, प्रतिव्रतेचा राग भयंकर असतो.

**हंबी०**:—माझा सोक्षमोक्ष केल्याशिवाय नाहीं मोहने तुला मी—

**मोह०**:—काय? हंबीरराव, तुम्ही मला अडविणार? हा मोऱ्यांचा हिरवा महाल नव्हे बरें! सरका मागें मुकाट्यानें. [ वाट सोडतो. मोहना जाते.

**हंबी०**:—मोहने, जाऊं नको; मी तुझ्या हुकुमाबाहेर नाहीं. मोहने, मोहने,—अरे मी, किती मोठ्यानें ओरडत आहें! माझें बोलणें मोहनेशिवाय दुसऱ्या कोणीं ऐकलें तर नसेल ना? कोणी आसपास तर दिसत नाहीं. मोहनेनें 'हंबीरराव मागें सरा' म्हणून ताकीद दिली आणि माझ्या शरीरानें ती मान्य केली; आणखी वेड काय लागायचें उरलें आहे? मोहना आपलीशी करण्याची जी मसलत पिलाजीनें मला सांगितली, त्या मसलतीचे विरुद्ध धडधडीत आज मीं वर्तन केलें! माझें प्रचंड सैन्य आतां असून नसून सारखेंच; पिलाजीसारखे मसलती मुत्सद्दी असून-नसून सारखेच! मोहने, तूं माझी व्हावीस म्हणून आजपर्यंत मी खोट्या मार्गानें जात होतों; आतां खऱ्या खऱ्या प्रेमानें तुला आळविण्याशिवाय मार्ग नाहीं. [ पडदा.

## अंक दुसरा समाप्त.

# अंक तिसरा.



## प्रवेश पहिला.



**स्थळ**—कांचनगड.

[ दवलतराव प्रवेश करितो. ]

**दव०:**—चोहोंकडे सगळा घोटाळा झाला आहे. हा पिलाजी बाताड्या आहे का खऱ्या कळकळीचा मनुष्य आहे, हें कांहींच समजत नाहीं. कटांत अगदीं पहिल्यापासून असावा तसा वागूं लागला आहे ! हंबीररावानें परवां वचन दिलें, त्या वेळीं माझ्या मनाला पुष्कळ आधार वाटला; पण काल रात्रीं चंपेनें येऊन मजकूर कळविला, तो अगदींच निराळा ! प्रतापरावांच्या लग्नापूर्वीं हंबीररावानें मोहनेला मागणी घातली होती खरी, पण त्या वेळचें वेड अद्याप असेल, असें मला नव्हतें वाटलें. अरे वहिनीसाहेब आणि चंपा इकडेच येत आहेत. त्यांची गांठ घेऊन प्रतापरावांकडे जावें हें बरें. [ मोहना व चंपा येतात.

**चंपा:**—बाईसाहेब, ते पहा दवलतराव इकडेच येत आहेत. दरबाराला जात आहेत वाटतें. त्यांच्या कानावर सर्व मजकूर मीं घातलाच आहे. आपण एकदां—

[ दवलतराव जवळ जातो.

**मोह०:**—दवलतराव, चंपेनें सर्व हकीगत तुम्हांला कळविलीच आहे.

**दव०:**—हंबीररावांचें दांडगाईचें वर्तन मला कळलें; पण चंपेनें हंबीररावांचें पारिपत्य कोणत्या प्रकारचें करावयाचें, तें सांगितलें नाहीं.

**मोह०:**—हंबीररावांना शिक्षा करण्यास तुम्ही समर्थ आहां, सगळे खरें; पण तिकडच्या कानावर जर हा मजकूर गेला तर त्यांना आज किती वाईट वाटेल ! दवलतराव, हंबीररावांना शासन करण्याच्या उद्योगाला आजच लागायचें म्हटलें, तर केवढा भयंकर प्रसंग गुदरणार आहे, हें मला समजतें. हंबीररावांच्या या वेडगळ प्रयत्नांनीं आमचें एकमेकांवरचें प्रेम उलटें दुणावत नाहीं काय ? हंबी-ररावांची काडीचीहि भीति मोहनेला वाटत नाहीं. दुसऱ्या कोणच्याहि प्रसंगीं मींच होऊन स्वारीपाशीं हंबीररावांना शासन करण्याच्या गोष्टी काढल्या असत्या;

पण दवलतराव, तुम्हांला कळलेली हकीकत तिकडे कळवूं नका. हंबीररावांना शासन करण्याचें आज मनांत आणूं नका.

**दव०**:—हंबीररावांची एवढी प्रतिष्ठा ठेवण्याचें आम्हांला कारण दिसत नाहीं. परवां आमच्या कटांत ते मिळाले एवढेंच; पण ते मिळाले जरी नसते, तरी आमचें मोठेसें नुकसान होणार होतें असें थोडेंच आहे. दहाबारा दिवसांत पाय-थ्याला असलेल्या शत्रूच्या सैन्यासभोंवतीं कटवाल्यांचा गराडा पडेल, अशी मीं योजना केली आहे.

**मोह०**:—पण सैन्य येऊन दाखल होण्यास अद्याप दहाबारा दिवस अवकाश आहे ना ? मोहनेमुळें हंबीरराव व पिलाजीराव जर उद्यां उघडपणें बिथरले, तर कांचनगडाच्या आसपासच्या सर्व खिंडी रोंखून नाहीं का बसायचे ? व विजा-पुराजवळ असणाऱ्या कटांतील सरदारांना ताबडतोब कैद नाहीं का करणार ?

**दव०**:—वहिनीसाहेब, मला ह्या गोष्टी समजतात; पण हा आमचा सर्व खटाटोप मानासाठींच—अब्रूसाठीं—चालला आहे ना ? हंबीररावांनीं असा अप-मान केल्यावर स्वस्थ बसणें आमच्या कीर्तीला कधींहि शोभावयाचें नाहीं.

**मोह०**:—मला जें भय वाटत होतें, तें हेंच. ज्या योगानें तिकडे बेत सिद्धीस जाण्यास जरा तरी विघ्न होईल, ती गोष्ट करण्यास मोहना कधींहि रुकार देणार नाहीं. मान, अब्रु, हीं कशीं राखावींत हें मला समजतें; व सत्त्वाकारितां मरावें लागल्यास मोहना मोठ्या आनंदानें मरण्यास तयार होईल. दवलतराव, व्यूहांतल्या मंडळीचें सैन्य येईपर्यंत हंबीररावासंबंधानें तिकडे एक अक्षरहि कळवूं नका. मात्र हंबीररावांवर विश्वास ठेवल्यामुळें कसलाहि दगा होऊं नये एवढा बंदोबस्त तुम्ही ठेवा.

**दव०**:—हंबीररावांवर विश्वास ठेवण्याचें आतां नांवच नको. आम्ही तुम्हांला कटांत घेत नाहीं, असें त्यांना आठदहा दिवस न कळविल्यास कांहीं फायदा होईल खरा, पण—

**मोह०**:—पणबिण कांहीं नाहीं. अशा वेळीं दवलतराव, एक शब्दहि ह्यां-तला तिकडे बोलायचा नाहीं. [ जासूद येतो.

**जासू०**:—सरकार आपली वाट पहात आहेत.

**दव०**:—कोठें आहेत प्रतापराव ?

**जासू०**:—ह्या पलीकडच्या तांबड्या चौकांत.

**मोह०:**—दवलतराव, मी सांगितलेलें ध्यानांत धरायचें बरें कां ! चंपे, चल तांबड्या चौकाच्या जाळीपाशीं आपण बसूं; म्हणजे दवलतराव काय बोलतात तें ऐकावयास सांपडेल. [ पडदा.

---

## प्रवेश दुसरा.



[ प्रतापराव, दवलतराव, व पिलाजी बसले आहेत. ]

**प्रता०:**—दवलतराव, मान्यांनीं मसलत तर मोठी उत्तम काढली आहे. मला फार पसंत पडली. हंबीरराव म्हणत होते, माने मोठे कल्पक आहेत म्हणून, तें अगदीं खरें आहे.

**दव०:**—अशी मसलत तरी कोणची ?

**प्रता०:**—दुसरी कांहीं नाहीं, खानाचें चारपांच हजार सैन्य आहे, या सर्वांची आजच्या रात्रीं कत्तल करावी. विजापुरच्या पादशाहीचीं पाळेंमुळें खणून काढण्याच्या महत्कार्याला प्रथमची आहुति पांच हजारांची तरी दिली पाहिजे. पादशाही सैन्याची अशी कत्तल केल्याशिवाय तालिकोटचा सूड उगविल्यासारखें होणार नाहीं. दवलतराव, छापा घालण्याची ही संधि व्यर्थ दवडूं नये.

**दव०:**—मग कसे माने ? तुमचे आणि हंबीररावांचें मिळून दहा हजार इसम आहेतच; आज रात्रींच्या रात्रीं हें काम उरकीत असलां तर माझी कांहीं ना नाहीं.

**पिला०:**—( स्वगत ) माझ्याच तंगड्या माझ्या गळ्यांत अडकवायला पाहतो आहे चोर ! पण प्रतापरावांचे मनांत मीं काय भरवून दिलें आहे हें ह्याला कोठें माहीत आहे !

**दव०:**—माने, विचार कसला करीत आहां ?

**प्रता०:**—मीसुद्धां त्यांना तेंच म्हणत होतों पण त्याचें असें होतें, खान म्हणजे सर्वांवरचा मुख्य, तो खरा मालक, अशी सर्व सैन्याची समजूत आहे. तेव्हां कांहीं लोक आयत्या वेळीं हुकूम तोडतील व खानाला जाऊन मिळतील.

**पिला०:**—हें पहा दवलतराव, सैन्यांतल्या पांचदहा मुख्यांशिवाय इतरांना आमच्या कटाची कांहींच बातमी नाहीं. कांचनगडाशीं लढायचें, अशीच सर्व

सैन्याची समजूत आहे. तेव्हां एकाएकीं रात्रीं हुकूम सोडल्यास सर्व घोंटाळा होईल. शिवाय तुमच्याशीं अगदीं मोकळ्या मनानें बोलावयाचें म्हणजे, तुम्हीं पादशहाशीं उघड लढाई देण्यास प्रारंभ केला आहे; आणि आमची दुस्मानगिरी अद्याप गुप्त आहे. तुम्ही उघड शत्रु आहां—तुम्हांस छापा घालण्यास किंवा कांहीं-हि करण्यास हरकत नाही. मैदानावर उघड झुंजाझुंजीस सुरवात होऊं द्या, आम्ही तुम्हांस येऊन मिळतों; किंवा छापा घालून खानाला नाहींसा करा, मग उजळ माथ्यानें तुम्हांला येऊन मिळण्यास आम्हांस हरकत नाहीं.

**प्रता०:**—हो, तें बरोबर आहे. दवलतराव, असें करूं, गडावर दोन हजार लोक ठेवूं, पायथ्याला एक हजार असूं द्या, आपण दोन हजार खालीं मैदानावर जाऊं आणि ह्या सर्व चोरांना देऊं आमच्या तरवारींना पहिले बळी !

**पिला०:**—हं ! असें केलें म्हणजे झालें. सहज काम होणारें आहे. आपलें पंधरा हजार सैन्य आहे, ह्या घमेंडीवर खान नेहमीं गाफीलच असतो.

**दव०:**—सगळें खरें; पण प्रतापराव, खालीं शत्रूचें सैन्य पंधरा हजार आहे, हें विसरतां कामा नये.

**पिला०:**—शत्रूचें सैन्य पंधरा हजार ! दवलतराव, मला—मान्यांना—जाधवांच्या पिढीजाद नोकरांना—तुम्हीं शत्रु समजतां अं ! हंबीररावांनीं व मीं फुकट फुकट तुमच्या देखत आणाशपथा घेतल्या म्हणावयाच्या! दवलतराव, तुमच्याप्रमाणें आम्हांलाहि वाटतें, पादशहाचा नाश करून विजयानगरचें तख्त पुन्हां स्थापावें, पादशहाचे अमीरउमरावांना लाथाबुक्या मारून उत्तरेस हांकलून द्यावें, लक्षावधि हिंदूंची त्यांनीं कत्तल केली, ह्याचा सूड उगविण्याकरितां त्यांच्या नरडींची हाडें कडाकड फोडावींत ! दवलतराव, तुम्हांला तेवढा धर्माचा अभिमान, आणि आम्ही बाकीचे सर्व पशु, असें मानूं नका. प्रतापराव, पादशहाची आजपर्यंत नोकरी केली, पण या नरकवासांतून बाहेर पडण्याची संधि मिळत असतां आम्ही त्यांतच लोळत राहूं, इतकें आम्हांला नीच, निलाजरे, समजूं नका. विजापुरचे गादीपुढें केंसभरहि मान वांकविली नाहीं, अशी प्रौढी मिरविण्याइतकें पुण्य आमच्या पदरांत नसेल, हें मी कबुल करतों; पण जे महात्मे आहेत,प्रतापराव, तुमच्यासारखे पुण्यशील योद्धे आहेत,त्यांच्या पावलांवर पाऊल टाकून आम्हांला गेलें पाहिजे, हेंहि न समजण्याइतके आम्ही खात्रीनें पापी नाहीं.

**दव०:**—माने, तुमच्यावर माझा विश्वास नाहीं असें तुम्हांला वाटतें तरी

कसें ? तुम्ही आह्मी एक आंहों; कटांतील बारीकसारीक गोष्टीसुद्धां मीं तुम्हांला सांगितल्या नाहींत का ? माझें म्हणणें इतकेंच कीं, कोणतीहि गोष्ट करावयाची ती कोणी दगलबाजी करील कीं काय, आयत्या वेळेला आपण फशीं पडूं कीं काय, या सर्व गोष्टींचा विचार करूनच केली पाहिजे.

**पिला०**:—दवलतराव, तुमचें मन साफ नाहीं, हें उघड उघड दिसतें आहे. तुमच्या मनांत कांहीं तरी किंतु आला आहे. दवलतराव, मी तुम्हांला असें विचारतों, खानाच्या छावणीमध्यें आणि आमच्या छावणींत कोस दीड कोसाचें अंतर आहे, हें तरी खरें ना ? आमच्या छावणींत कांहीं हालचाल झालेली तुम्हांला दिसल्यास खानाला जाऊन आम्ही मिळेतोंपर्यंत गडावर चढण्यास तुम्हांला अवकाश मिळेलना ? बरें गडावरून अगदीं खालीं उतरेतोंपर्यंत आमच्या छावणींत कांहीं हालचाल होते कीं काय, हें तुम्हांला तुमचे हेर सहज सांगतील कीं नाहीं ? दवलतराव, विश्वासघात करण्याचा आमचा इरादा जरी असला, तरी ह्यांत तुम्हांला कोणचा धोका आहे ? फार झालें तर छापा साधावयाचा नाहीं इतकेंच.

**प्रता०**:—हो, इतकेंच.

**पिला०**:—दवलतराव, तुमच्या मनांतील संशय नाहींसा करण्याकरितां आम्ही इतक्या गोष्टी करण्यास कबूल आहों. मी व हंबीरराव, तुम्हीं गडावरून खालीं उतरण्यापूर्वीं आज रात्रीं गडावर येऊं; आणि वेशीवरच्या पहारेकऱ्यांना सक्तीचे हुकूम सोडा, गडावरून बाहेर जाणाऱ्या प्रत्येकास पाहून सोडावें;व हंबीर-रावांना व पिलाजीरावांना तुम्ही विजयी होऊन परत येईतों खालीं जाण्याची मनाई करावी. दवलतराव, आम्ही दोघे ओलीस राहतों, माझ्या बोलण्यांत खोटे-पणा नाहीं हें सिद्ध करण्यास ह्याशिवाय मजपाशीं दुसरा मार्ग नाहीं.

**दव०**:—प्रथम कडू, मागून गोड असलेलें बरें. तुम्ही सांगितली अशी अक्ष-रशः व्यवस्था झाल्यास माझा तुमच्या मसलतीस रुकार आहे.

**प्रता०**:—माने, तुमच्या म्हणण्याप्रमाणें आज रात्रीं छापा घालण्याचा बेत ठरला.तुम्हां दोघांना ओलीस ठेवावयाचें हें मला कांहीं पसंत नाहीं. परंतु आमच्या दवलतरावांचें असें आहे कीं, गुरूंनीं जसा उपदेश केला त्या कायद्याबरहुकूम सर्व गोष्टी झाल्याच पाहिजेत. तेव्हां त्यांच्याकारितां तुम्हांला त्रास सोसावा लाग-णार. [ पडदा.

---

## प्रवेश तिसरा.

**स्थळ**—कांचनगडावरील रस्ता.

[ दादासाहेबांचे दोन नोकर प्रवेश करतात. ]

**पहि०:**—आज धनीसाब अक्शी लई खूस झाल्याती. हें बघ इनाम ( रुपया दाखवून ) प्यायाला; तुला म्हणतूया दादासायबांच्या तैनातीला बस म्हणून. आमच्या फडांतल्या समद्यास्नी आज दारूची काय नुसती लूट ! बस बस बाई-सायबांच्या तैनातीला बस. आज तुमच्या फडाला योक थेंब गवसला तर पठ्याच नव्ह.

**दुस०:**—आम्ही बाईसायबांच नोकर म्हंजे काय भिकारी व्हय ? दारूची भीक मागाया कोण दांत इचकतो हाय तुझ्याजवळ. चल जा, एक रुपयाचं दिमाख दावतुया. ही बघ लेका मोहोर ! ही बघ पुतळी ! बाईसायबांची तैनात उगच नाहीं. म्हटलं ऐकलं का राव ! म्हातार माणसांत आन तरण्यांत रुप्याचं सोन्याचं अंतर हाय ! तुझं दादासाबाच रूप, अकशी कथील. आमच्या बाईसाब सोनं आन् त्येबी सोन !

**पहि०:**—आज बाई लई खूस दिसत्यात ? काय रंग है काय ?

**दुस०:**—विजापुरचं सरदार पिलाजीराव आज ताटाला यायचं हैती ! बाईसाबाच्या घरचं माहेरचं हैती! समद्यांनीं आज खायाची काय,प्यायाची काय लूट करावी ! ह्ये बघ अक्शी गरीबावानी न्हाई दावायचं. आज सिरमंताच्यांत भईन पडलिया असं पिलाजीराव मान्यांना दिसाया होवं !

**पहि०:**—सासुरची सिरमंती दावनार बाईसाब. आलं ध्येनांत. इचिभन मग आम्हास्नी कांहीं—

**दुस०:**—चल गड्या, आज काय कमती ! लाव तो रुपडा कडोसीळा. आंज ह्याच पठ्या संमद्यास्नी दारूची आंघोळ घालणार. [ जातात.

---

## प्रवेश चवथा.



**स्थळ**:—कांचनगड.

[ पिलाजीराव व हंबीरराव येतात. ]

**हंबी०**:—पिलाजीराव, तुमच्याबरोबर मी येथपर्यंत आलों खरा; पण पुढें न जातां येथूनच खालीं परतावें असें मला वाटतें.

**पिला०**:—हा काय भलताच विचार ? आणि अशा वेळीं, अशा ठिकाणीं ? आपण गडाच्या विजापूर दरवाज्यापाशीं तर आलों, प्रतापराव व दौलतराव वेशीच्या आंतल्या अंगाला आपली अगदीं वाट पहात असतील. हंबीरराव, गड चढून वर आल्यावर, तुम्हांला परतावेसें वाटतें तरी कसें ?

**हंबी०**:—मी तरी काय करूं ? पिलाजीराव, माझें पाऊलच पुढें पडत नाहीं. असें करूं का तसें करूं, ह्याचा विचार करण्याचा मला अधिकारच उरलेला नाहींसें वाटतें. कोणी तरी गुप्तपणें माझ्या जिवाला मुठींत गच्च दाबून धरिलें आहे, आणि त्यामुळें माझ्या शरिराला तो खेंचून पाहिजे तिकडे नेत आहे, मोहनेला आवडणार नाहीं असें कायसेंसें मी करीत आहे, असें मला वाटतें !

**पिला०**:—( स्वगत ) पुन्हां पिशाच्चानें घेरिलें ! ( उघड ) हंबीरराव, मोहनेला आवडायचें नाहीं असें कायसें तुम्ही करीत आहां, असें तुम्हांला सांगितलें तरी कोणीं ? मी म्हणतों, हंबीरराव, मोहनेला एकदां तुम्ही आपल्या ताब्यांत घ्या, मग अशाच रीतीनें कां मला जिंकलेंत, तसेंच कां वागलां, असें एक शब्दानें जर तिनें तुम्हांला विचारलें, तर माझें नांव बदलून टाका. मात्र मोहनेच्या मनांत थोडकें तरी तुमच्याविषयीं प्रेम पाहिजे; आणि तें आहेच.

**हंबी०**:—आहेच कशावरून ? माझ्या आपलें मनाला तसें वाटतें झालें. आमच्या पूर्वजन्मींच्या पापामुळें आमची आज ताटातूट झाली आहे; पण आंतला खरा प्रकार पाहिला तर ती माझ्याकरितां आहे, व मी तिच्याकरितां आहे, अशीच ब्रह्मदेवाच्या घरची मूळची योजना असली पाहिजे. पण एकदां असें वाटतें, कदाचित् हा मला भ्रम झाला नसेल कशावरून ?

**पिला०**:—छे, छे, असा भ्रम व्हायचाच नाहीं. ज्या गोष्टी उघड दिसत नाहींत, व ज्यां संबंधानें मनाला संशय वाटतो, त्यासंबंधानें थोर पुरुषांच्या

मनाची जी प्रवृत्ति होईल तीच खरी, असें कवींनीं लिहून ठेविलें आहे. माझ्या अंतःकरणाला खरें खरें काय वाटतें सांगूं ? हंबीरराव आणि मोहना हीं नांवें देखील एकमेकांशीं कशीं जुळून दिसतात ! अशी जोडी कोंठेंच सांपडावयाची नाहीं ! आणि तिच्या कृतीवरून असेंच दिसतें.

**हंबी०**:—वा ! काल तर मला ती झिटकारून निघून गेली !

**पिला०**:—हंबीरराव, पूर्वी मोऱ्यांच्या वाड्यांत हिरव्या-महालांत मोहनेला धरावयाला तुम्ही धांवलां होता, आणि कालहि तुम्हीं तिचीं आर्जवें करण्याचा प्रयत्न केलात; दोन्ही वेळची हकीकत तुम्हीं मला सांगितली आहे. चिडलेल्या नागिणीप्रमाणें त्या दिवशींसारखी ती तुमच्या अंगावर काल चवताळून आली का ? तुम्हीं मोठे पराक्रमी व्हावेत, हिऱ्याच्या तेजाप्रमाणें तुमची कीर्ति चोहोंकडे पसरावी, असें तिला कां हो वाटतें ? शिवाय मी तुम्हांला असें विचारतों, मोहनेला अशा रीतीनें तुम्हीं चिडविडल्यावर, प्रतापराव, दवलतराव, अद्याप आम्हांवर विश्वास ठेवितात, ह्यांतलें इंगित काय बरें असावें ? अहो, दुसरें काय ? तुमच्यावर तिची प्रीति आहे, म्हणून कोणापाशीं कांहीं कालच्याबद्दल ती बोलली नाहीं !

**हंबी०**:—मग काल माझ्याशीं प्रेमाचा एक शब्द तरी का बोलली नाहीं ?

**पिला०**:—हंबीरराव, तुम्हांला स्त्रियांचा स्वभाव कसा असतो तें माहीत नाहीं. प्रेम आहे असें त्यांनीं बोलूनच दाखवायला नको; आणि ज्या मानी आहेत त्या प्राण गेला तरी तसें बोलून दाखवावयच्या नाहींत. स्त्रिया शौर्यावर, कर्तबगारीवर लुब्ध झाल्याच पाहिजेत. मोहनेला प्रथम आपल्या ताब्यांत घ्या, तुमच्या मनांत प्रेम किती ओतप्रोत भरलेलें आहे तें तिला दाखवा, मग तुमच्याशीं ती कशी गोड गोड कुजबुजायला लागतें तें पहा ! हंबीरराव, ही पहा वेस आली; सर्व मंडळी आंत तयार आहेत. चला, आंत जाऊं या. माझा आज रात्रींचा बेत साधूं द्या, उद्यां नाहीं तर परवां रात्रीं मोहना तुमच्या महालांत आली म्हणून समजा. चला.

**हंबी०**:—पिलाजीराव, कड्यावरून मला आणि मोहनेला मी खालीं लोटून देतों आहेसें मला वाटतें ! काय होईल तें होवो, मी तुमचा हात धरून उडी घेतोंच. मोहनेची आणि माझी गांठ घालून देण्याचें काम आतां सर्वस्वीं तुमच्यावर आहे.

[ पडदा वर जातो. प्रतापराव, दवलतराव, सैन्यासह उभे आहेत.]

**दव०-प्रता०**:—या हंबीरराव, या पिलाजीराव.

**प्रता०**:—आमची सर्व तयारी आहे. तुम्ही येण्याबरोबर "हरहर महादेव" करून वेशींतून बाहेर पडावयाचें, असा संकल्प करून आह्मी येथें उभे आहों. तुम्हांला जरा उशीर लागला!

**पिला०**:—छावणींतून निघायला उशीर झाला. सैन्यांतल्या मुख्य पांच सात असामींना एकीकडे बोलावून, त्यांना सर्व मजकूर सांगून आमच्या सैन्याचा बंदोबस्त कसा ठेवावयाचा तें ठरवून सगळे आटपायला जरा उशीर झाला. तुमची मात्र तयारी जय्यत आहे.

**प्रता०**:—असें ठरविलें आहे, दीड हजार लोकांनीं छाप्याच्या कामावर जावयाचें व हजारांनीं गडाच्या पायथ्याचें संरक्षण करावयाचें. तेव्हां दवलतराव म्हणूं लागले, आपण छाप्याची कामगिरी पतकरणार, मी म्हणूं लागलों, तें काम माझें आहे. तुम्ही आपलें पायथ्याचें संरक्षण करीत उभे रहा. अखेरीला आम्ही दोघांनीं छाप्यावर जावयाचें ठरलें, व आम्ही परत येईतोंपर्यंत, ह्या रेंभाजी-रावांनीं पायथ्याचें संरक्षण करावें, व ह्या संताजीरावांनीं गडाचें संरक्षण करावें, असें ठरलें आहे.

**पिला०**:—एकंदरींत आम्ही दोघांनीं संताजीरावांचे हुकमतींत असा-वयाचें.

**प्रता०**:—हुकमतींत कसले! आणि तुम्ही ओलीस तरी कसले! रामराम मंडळी; आम्ही आतां वेशींतून खालीं उतरतों. (सैन्यास उद्देशून) वीरहो, विजापुरच्या पादशाहीचीं पाळेंमुळें खणून काढून, तालिकोटाचे लढाईचे वेळीं विजयानगरला लागलेली काळोखी धुऊन काढण्याची तुम्ही प्रतिज्ञा केली आहे. वीरहो, रामराजाचें शीर तालिकोटचे लढाईपासून अद्याप विजापुरच्या वेशीवर टांगलेलें आहे. तें रामराजाचें शीर नव्हे, तुमच्या विजयानगरचें, तुमच्या धर्माचें तें शीर आहे! यवनांची चांगली कत्तल करून लढाईंत यश मिळवून या चोरांना तुडवीत तुडवीत जर विजापुरच्या वेशीपर्यंत तुम्ही धडकलां तर रामराजाचें तें शीर, तुमच्या धर्माचें तें शीर, अद्याप सजीव होईल, व रामराजाच्या नेत्रांतून अजूनहि आनंदाश्रू वाहूं लागतील. वीरहो, रात्रंदिवस कित्येक वर्षें सतत लढत राहून, आदिलशाहीस डबघाईस आणून, विजयानगरची कीर्ति नर्मदेच्या पली-कडे नेणारे तुमचे वाडवडील होते. थोडे दिवसांपूर्वी विजयानगर स्वतंत्र अस-तांना, विजयानगरचा घोडा आज पूर्व समुद्रावर, तर उद्यां पश्चिमसमुद्रावर, असे

वरिहो, तुमच्याच धाडसाबद्दल, व तुमच्याच भरारीबद्दल, सर्व लोक पोवाडे गात होते! सरदारहो, तुमच्यावर कोपलेल्या भवानीला जर तुम्हांला संतुष्ट करायचं असेल, तुम्हांला सदोदित यश मिळावें म्हणून हातांतील तलवारींना जर तुम्हांल प्रसन्न करावयाचें असेल, तर आमच्या शत्रूंना–ह्या विजापुरकरांना–तुमच्य तलवारीस प्रथमचे बळी देण्याकरितां मजबरोबर चला. बोला, हरह महादेव.

[ हरहर महादेव अशी गर्जना करीत सर्व सैन्य प्रतापरावांमागून जातें. ]

**दव०:**—संताजीराव, हे दोन सरदार तुमच्या ताब्यांत आहेत. कांचनगडावर पाहिजे तिकडे फिरण्यास यांना परवानगी आहे; पण कांचनगडाच्या खाली माझा स्वतःचा हुकूम पुन्हां होईतों जर हे गेले, तर प्रथम तुम्हांला तोफेच्या तोंडीं जावें लागेल. पिलाजीराव, हंबीरराव, तुम्ही ओलीस आला आहां, तुमच्या तलवारी तुम्हीं संताजीरावांचे स्वाधीन आतां केल्या पाहिजेत.

**हंबी०:**—तालिकोटची लढाई झाल्यावर, विजयानगरच्या सर्व सरदारांना शस्त्रें खालीं ठेवा म्हणून पादशहानें हुकूम केला; पांच वर्षांचा बच्चा असतांनाहि त्या वेळीं ह्या हंबीररावानें तलवार खालीं ठेवली नाहीं,—

**पिला०:**—( हंबीररावास एकीकडे ) मोहनेकरितां, हंबीरराव, मोहनेकरितां; ( हंबीररावांची तलवार घेऊन ) संताजीराव, ह्या घ्या तलवारी.

**दव०:**—संताजीराव, मी जातों आतां सैन्याबरोबर. कोणाच्या पापबुद्धीनें, कोणाच्या महत्त्वाकांक्षेनें, जर आमच्या मूळ कामाला धोका बसला तर त्याचें पाप संताजीराव तुमच्या माथीं बसेल. सर्व वेशीवर सक्त पहारा ठेवा; वहिनीसाहेबांच्या महालाच्या पहाऱ्यावर दहा निवडक गडकरी अधिक ठेवा; संताजीराव, तुमच्यावर सर्व गोष्टी सोंपवून आम्ही खालीं जात आहों. वहिनीसाहेबांना भेटा, आणि त्या सांगतील त्याप्रमाणें आणखी कांहीं नवीन व्यवस्था ठेवावयाची असेल तर ठेवा. [ जातात.



पिला०——मोहनेकारितां, हंबीरराव, मोहनकारितां, [ पृ० ४८

# प्रवेश पांचवा.

**स्थळ**—कांचनगड.

[ पिलाजीराव माने येतो. ]

**पिला०**:—दवलतरावानें आपल्याकडून खूप कारस्थान केलें ! हंबीररावांच्या दांडगाईच्या वर्तनाविषयीं मोहना दवलतरावापाशीं खात्रीनें बोलली असली पाहिजे. आणि आमच्याशीं कोणच्याही प्रकारचा संबंध ठेवावयाचा नाहीं, असा त्याचा सकाळचा बेतहि दिसला. पण आम्ही दोघे ओलीस राहतों म्हणण्याबरोबर, स्वारीच्या तोंडाला पाणी सुटलें. खानाच्या सैन्याला आयतें लोळवायला सांपडतें ! आम्ही दोघे ओलीस ! धोका नाहीं कांहीं नाहीं ! बरें विजयी होऊन परत आल्यावर आम्हांला कटांतून हांकून द्यायला, कैदेंत टाकायला, किंवा आमच्या सैन्यावर छापाहि घालायला हरकत नाहीं ! दवलतराव मनांत म्हणत असेल, आज मी आतिशय वस्तादगिरीनें वागलों. पण मान्यांच्यापाशीं पासष्टावी कळा आहे, हें त्या बिचाऱ्याला कोठून ठाऊक असणार ? ( पडद्यांत कलकला ) मी दादासाहेबांच्या घरापाशीं तर आलों. हे देवडीवरचे नोकर यथेच्छ मद्य प्याल्यानें झिंगून बरळत आहेत. हा तर बंदोबस्त लक्ष्मीनें सांगितल्याप्रमाणें चांगला ठेविला !

[ हातांत मद्यपात्रें घेऊन तीन पहारेकरी येतात.

**पिला०**:—दादासाहेब काय करीत आहेत रे ?

**पहि०**:—कोन तूं दादासाहेब, का त्यो दादासाहेब, का ह्यो दादासाहेब ?

**दुस०**:—अरे तूंच दादासाहेब. दादासाहेबाला आणखी कांहीं शिंगंबिंगं असत्यात व्हय ? अक्शी असंच पित्यात गटागटा.

**तिस०**:—व्हय व्हय. असंच पित्याती अक्शी. पण त्यो दादासाहेब व्हायला त्येला ती फटाकडी रानी कुठ हाय दारू भरूनशानी द्येयाला ? उगाच वाटच्या वाटसराला दादासाहेब म्हनावं खुळ्यावानी ?

**पहि०**:—कोनाला म्हनतुया खुळा ? लई झाली वाटतं ? मी दादासाहेब नव्हं व्हय ? तूंच माझी फटाकडी रानी. चल राऱ्यांना काय तोटा असा मर्द असतांना ? चल, मथुरेच्या बाजाराला जाईन म्हनतो, तुला लाल साडी आनीन म्हनतो,—

**दुस०:**—पी पी शिंगोटा घाली पिंगोटा—

**पिला०:**—दारू पिऊन काय पाहिजे तें बरळत आहेत! काय रे दादासाहेब काय करीत आहेत?

**पहि०:**—दादासायेब आमव की धनी.

**दुस०:**—त्यावानी नाहीं होनार कुनी.

**तिस०:**—राजा तो कीं माजूम दारूचा,

**पहि०:**—पूर आला भाला रे उंचीचा;

**दुस०:**—कशाचा कशाचा रे कशाचा?

**तिस०:**—दारूचा दारूचा रे दारूचा;

**सर्व:**—पूर आला भाला रे उंचीचा.

**पहि०:**—गळीं बांधुनि माजूमाची वडी,

**दुस०:**—दारूच्या पुरी घेऊं आम्ही उडी,

**तिस०:**—पोट फुगे परी न येऊं वरी;

**सर्व:**—जिजू जिष्णू जैसा जीरसागरीं. [ जातात.

**पिला०:**—बरे खुलले आहेत! लवकर शुद्धीवर येण्याची मुळींच भीति नाहीं. आतां आंत जावें.

[ पडदा वर जातो. दादासाहेब दारू पीत आहेत व लक्ष्मी जवळ उभी आहे.

**दादा०:**—एकसारखी दारू पिण्याचा मीच काय तो मक्ता घेतला आहे वाटतें? तूं पी, तूं पी!

**लक्ष्मी:**—मी घेतले एक दोन पेले; पुरे झाले तेवढे मला. पिलाजीराव आल्यावर आणखी घेईन. आतां कशाला?

**दादा०:**—तारें होण्याबरोबर पिलाजीराव बाहेर गेले हंबीररावांकडे, ते अजून कसे आले नाहींत! निम्मे अधिक संपलें वाटतें. ( पेला घेतो. ) छे, तूं घेच. बायकांनीं किती दारू प्यायली पाहिजे ह्याची सीमा आहे, ठाऊक आहे कां तुला?

**पिला०:**—( पुढें होऊन ) पुरुषांच्या दुप्पट होयना दादासाहेब?

**दादा०:**—या या या. बसा बसा बसा. प्या प्या प्या. (पेला पुढें करितो) तुम्हांला यायला उशीर लागला आणि मला तर अतिशय तहान लागली, म्हणून केलें हें काम सुरू तुम्ही येण्यापूर्वी. हें घ्या.

**पिला०:**—आपण एक घ्यायचा. ( दादासाहेब हातांत पेला घेतो. ) त्यांना नको का एक तरी?

लक्ष्मी:-- मीं दोनतीन घेतले आहेत. बायकांनीं अधिक घेऊं नयेत.

दादा०:—पिला०:—काय त्याला होतें ? [ सर्व पितात.

पिला०:—बायकांनीं पुरुषांच्या दुप्पट दारू पिण्यास कांहीं हरकत नाहीं.

दादा०:—छे ! त्यांचें प्रमाण निराळें आहे. ( पेला झोंकून ) तरुणीनें इतकें मद्य घेतलें पाहिजे कीं, तिचे डोळे तांबडेलाल होऊन चमकूं लागले पाहिजेत. आणि ती मदिरेक्षणा पायांत घुंगूर बांधून नाचत नाचत जर पेला देऊन पुढें आली— [ नाचूं लागतो.

पिला०—( लक्ष्मीला ) दादासाहेबांना आतां जो पेला देशील, त्यांत एवढी पूड टाक, म्हणजे ते लवकर बेशुद्ध होतील.

दादा०:—( नाचतां नाचतां ) थयथय नाच झाला पाहिजे. काय सांगूं पिलाजीराव, तिच्या हातांतला तो पेला पाहिला,--एक पाऊल जमिनीला टेकतें न टेकतें तों दुसरें उचललें, असा पायाचा ठेका धरून, शरीर-अशी लवे तशी लवे-असें पायाच्या नाचांवर झेलून धरूं लागली, आणि तोरड्यांचा आवाज कानांत का शिरला,--किती गोड गोड धुंदी येते म्हणून सांगूं ? तिचें चपल पाऊल जसजसें जलदी उठायला लागतें, तसतसा , शरीरांत बांधून ठेविलेला जीव आहे कीं नाहीं, तो बंधनें तोडून तिच्याकडे उड्या मारीत जातो. (जाग्या-वर जाऊन बसतो. लक्ष्मी पेला पुढें करते. ) आणि ती जवळ आली, आणि तिच्या नाजूक बांध्याचा डोल होऊं लागला, म्हणजे जिवाला पाळण्यांत ठेवून गोड स्वरानें गाणीं म्हणत, कोणी झोंपा काढते आहेसें वाटतें. आणि तिच्या बोटांना हळूच हात लावून ( लक्ष्मीच्या हातांतला पेला घेऊन ) पेला घेतला, आणि प्यालों ( पितो. ) गोडच झोंप—साखरझोंप—झोंप [ बेशुद्ध होतो.

पिला०:--चल, लक्ष्मी चल; आतांपासून तूं माझी झालीस. ह्या थेरड्याची तुझ्यावर आतां काडीचीहि सत्ता उरली नाहीं. ( पेला हातांत घेऊन तिच्याजवळ जातो.) सुंदरी, प्रेमाच्या अस्सल अर्कानें भरलेल्या ह्या पेल्याचा मी तुला पहिल्या भेटीचा नजराणा देतों. मी तुला हें मद्य प्यावयास देत नाहीं.—प्रेम—निव्वळ प्रेम. सुंदरी, माझा स्वीकार करण्यापूर्वीं तूं ह्या माझ्या नजराण्याचा स्वीकार केलाच पाहिजे.

लक्ष्मी:—महाराज, तुम्ही मला कायशी महत्त्वाची कामगिरी सांगणार आहांना ? त्याची आठवण नाहींशी झाली वाटतें ?

पिला०:--तूं माझी झालीस, हा विचार मनांत येण्याबरोबर सर्व गोष्टी विस-

रून गेलों होतों. अजून आम्ही कांचनगडावर आहों, अजून तूं खरी माझी झाली नाहींस, पण तुझ्या हातून काम फत्ते होणार, याबद्दल शंकाच नाहीं. तूं. हें प्रेमासव घेतल्यानंतर कामगिरीचा विचार.

**लक्ष्मी**:--महाराज, मी जर मद्य फार प्राशन केलें तर माझ्या हातून काम पार पडणार नाहीं.

**पिला०**:—छे ! मी मघाशीं सांगितलें नाहीं का, बायकांनीं पुरुषांच्या दुप्पट दारू प्यावी, तोंपर्यंत कांहीं हरकत नाहीं म्हणून. मदिरेचा प्रत्यक्ष अवतार तूं. तुला हें मद्य काय करणार आहे ? फिरली मान ! बरें, पुरुषा इतकी तरी बायकांनीं दारू पिण्यास हरकत नाहीं. तूं निम्मा पेला घे, मी निम्मा घेतों. (घेतात). लक्ष्मी, चल आतां अगोदर ह्या महालांतून बाहेर पडून भुयाराकडे जाऊं. ( दादासाहेब निजलेल्या जागेपुढें पडदा ). कांचनगडावरून खालीं आमच्या छावणींत माझ्या तंबूंत तुला केव्हां घेऊन जाइनसें मला झालें आहे. बरें, सकाळीं सुचविलें होतें तसें केलें आहेस का ?

**लक्ष्मी**:—हो, अगदीं सांगितल्याप्रमाणें तजवीज ठेविली आहे. भुयारांत जेथें दारूचीं पोतीं भरून ठेविलीं आहेत, तेथपासून जिन्याच्या तोंडापर्यंत एक पोतें दारू पसरून ठेविली आहे. आणि एक लहानशी पिशवी वर आणून त्या दारापाशीं ठेविली आहे.

**पिला०**:—आण पाहूं ती. ( लक्ष्मी आणावयास जाते. ) सांगत असाल तर प्रत्यक्ष नवऱ्याच्या उरांत खंजीर देखील खुपसते म्हणणारी ही साहसी अवदसा मी नाचवीन तशी खात्रीनें नाचणार ! शिवाय आतां मद्य प्याल्याची धुंदीहि तिच्यावर बेताची आली आहे. [ लक्ष्मी दारूची पिशवी घेऊन येते.

**पिला०**:--( पिशवी हातांत घेऊन ) दमट बिमट कांहीं नाहीं. ही दारू तेव्हांच पेट घेईल. भुयारांतील सगळी दारू अशीच कोरडी आहे ना ?

**लक्ष्मी**:—हो, अशीच कोरडी आहे. दमटबिमट कांहीं नाहीं.

**पिला०**:—लक्ष्मी, मी आतां जसें सांगेन तसें करण्यास जर काडीभरहि चुकली नाहींस तर प्रतापरावांना मातीस मिळवितों, तुला माझी पट्टराणी करून तुझा अपमान करणाऱ्या मोहनेस तुझी दासी करितों; कांचनगडच्या महालाची तुझ्या नांवाची बादशहाकडून जहागीर करून देतों.

**लक्ष्मी**:—आपण माझा स्वीकार केला म्हणजे मला जहागीर मिळाली, सर्व कांहीं मिळालें.

**पिला०**:—नीट लक्ष देऊन ऐक. दारूच्या कोठाराच्या दारूपासून वाड्याच्या अगदीं बाहेरच्या दरवाजापर्यंत, ही दारू अशी एका ओळीनें ओतून ठेव. आणि पेटलेला कांकडा घेऊन माझ्या खुणेची वाट पहात बैस. मी आतां जातों. गडावरून निसटून जाण्याची माझी सर्व तयारी झाली, म्हणजे खुणेचा म्हणून एक बंदुकीचा बार काढीन. त्याबरोबर दारूला कांकडा लाव आणि पश्चिमेच्या मैदानांत पळत ये. खांद्यावर बसवून गडावरून पळवून न्यावयास मी तेथें आहेच.

**लक्ष्मी**:—मी बंदुकीचा बार केव्हां होईल, त्याची वाट पहात बसतें. जितकी लवकर खूण द्याल तितकी बरी; कांचनगडावरून तुम्ही मला केव्हां न्याल, असें मला झालें आहे.

**पिला०**:—हं, तूं लाग तर आपल्या उद्योगाला. माझ्या तयारीला हा मी निघालोंच.

**पिला०**:—( स्वगत ) आतां असें करावें. खानाच्या सैन्याची कत्तल करून प्रतापराव मागें परतलेले दिसले म्हणजे एकदम खुणेचा बार काढावा. प्रतापराव, दवलतराव विजयी होऊन, मोठ्या आनंदानें गडावर चढताहेत तों आमची ही दिवटी गडाची राखरांगोळी करणार ! आमचें कारस्थान तर उत्तम साधलें; प्रतापरावांचा आतांपर्यंत माझ्यावर पूर्ण विश्वास, दादासाहेबांचे तर आम्ही जुनाट दोस्त, हंबीररावांना माझ्याशिवाय सत ना गत ! आतां गुरगुरणाऱ्या दवलतरावाच्या व विजयानगरचा मुख्य सेनापति होऊन सर्वांवर सत्ता मिरवूं पाहणाऱ्या प्रतापरावाच्या मुसक्या बांधून विजापूरला न्यायला काय उशीर ? उद्यां सकाळीं पिलाजीरावाच्या तोंडून जो जो शब्द निघेल तो तो प्रत्येकानें—प्रतापरावानें—दवलतरावानें—झेललाच पाहिजे. दादासाहेब, लक्ष्मी, हीं दुधखुळी दारूंत होरपळून मरणार ! मरीत बिचारी ! मला त्याचें सुखदु:ख तितकेंच आहे. प्रतापरावाचा पराभव करून हे बंडखोर बादशहापुढें उभे केले, कांचनगडच्या सुभ्याच्या निम्याइतकी निदान पादशहाकडून जहागीर उपटली, म्हणजे पादशहाच्या वजिरीवर पुढें डोळा ठेवण्यास हरकत नाहीं. मोहना, यमुना, पण हा बायकासंबंधाचा विचार मागाहून करूं. वैभव पदरीं पडल्यानंतर त्याचा उपभोग घेतांना बायका पाहिजे असतात. तोंपर्यंत मोहने—यमुनेसंबंधाचे विचार मला नकोत. [ जातो.

## अंक तिसरा समाप्त.

# अंक चवथा.

## प्रवेश पहिला.



**स्थळ**—कांचनगड, पश्चिम बुरूज.

[ मोहना येते. ]

**मोह०**:—छाप्याचें काम आटपून एव्हांना स्वारी परत यावी खरें म्हटलें असता! लांब तेथें खानाच्या छावणीपाशीं आतां उजेड दिसूं लागला! विजयी होऊन स्वारी परत येण्याबरोबर पंचारती ओंवाळून दृष्ट काढीन. अंबाबाईच्या दर्शनाला स्वारी जाऊं लागली म्हणजे सोन्याचा नारळ करून ठेविला आहे,—तो मातोश्रीपुढें ठेवण्यास हातांत देईन. हें काय पण? इतका वेळ काय करीत आहेत? बायकांना लढाईंत बरोबर कां नेत नाहींत कोणाला ठाऊक? मी जर बरोबर असतें,—रणांगणावर गाजविलेल्या त्यांच्या शौर्याचें वर्णन ऐकून जर माझ्या मनाला इतका आनंद होतो; तर शौर्याचा अवतार रणभूमीवर पहावयास मिळाल्यावर,—दिवट्या हालल्यासारख्या दिसतात हं! विजयी होऊन या कड्याखालीं स्वारी केव्हां येईल, आणि मी हीं फुलें केव्हां उधळीन, असें मला झालें आहे. फुलें उधळल्यावर, महाराज, तुम्ही आपल्या आवडत्या मोहनेकडे तर पहाल ना? काय बाई तरी! अजून त्या जागच्या उजेड कसा हालत नाहीं? हंबीररावांनीं—पिलाजीरावांनीं—कांहीं दगा दिला नसेलना? हंबीरराव गडावर ओलीस आहेत, तेव्हां हंबीररावांकडून दगा होण्याचा

[ हंबीरराव येतो.

**हंबी०**:—हंबीररावाकडून दगा होईल, असें मोहने, तुला वाटतें तरी कसें? हंबीरराव तुझा दास, आणि त्यापासून भीति? मोहने, पाहिजे तो हुकूम तूं मला—

**मोह०**:—अग बाई! पण हे कोण? हंबीरराव, तुम्ही एवढ्या रात्रीं येथें कसे आलां?

**हंबी०**:—तूं त्या जागीं चालली असशील—तेव्हां त्या फुलझाडांना तुझा

हात लागला असेल,-ही जागा,-तीं फुलझाडें,-हींच माझीं पवित्र स्थानें,-ह्याच माझ्या पवित्र वस्तु !

**मोह०:**—( स्वगत ) मोठी पंचाईत आली. रात्रीची वेळ, मी एकटी !

**हंबी०:**—मोहने, मला जर कोणीं यात्रेला जा म्हणून सांगितलें असतें, तर तुझ्या स्पर्शानें पवित्र झालेल्या याच जागेकडे मीं धांव घेतली असती ! तुझ्या मोहक मूर्तीचें ध्यान ह्या ठिकाणाशिवाय इतर ठिकाणीं कसें चांगलें साधेल !

**मोह०:**—हंबीरराव, तुम्ही भलताच नाद वेडेपणानें कशाला धरितां ? तुमच्या ह्या गरीब बहिणीची तुम्हांला अशी विनंति आहे, तुमचें शौर्य, तुमची हुशारी, तुमचें वजन, हीं सर्व तुमच्या धर्माच्या उपयोगीं पडावयाचीं तीं कवडीमोलाचीं कां करितां ? मजसारख्या एखाद्या क्षुल्लक स्त्रीवर-तुमच्या धर्म-भगिनीवर-लक्ष ठेऊन, आपला स्वतःचा जन्म फुकट कां दवडतां ! अयोध्या, गया, काशी, पंचवटी, तुमच्या धर्मांतील पवित्र स्थानें काय कमी आहेत ? सीता-देवीसारख्या महासाध्वीच्या स्पर्शानें पवित्र झालेलीं शेंकडों स्थानें आमच्या देशांत आहेत. हंबीरराव, तुमच्या अंगांत हिम्मत असेल तर, हे यवन आमचीं पवित्र देवस्थानें बाटवीत आहेत, त्याची लाज धरा, त्या स्थानांना शत्रूंच्या कचाट्यांतून सोडवा, व आपलें क्षात्रतेज जगाला दाखवा.

**हंबी०:**—मोहने, मीं क्षात्रतेज जगाला दाखविलें असतें; धर्मसेवा केली असती; पण तें व्हावें कसें ? माझा आत्मा, माझा जीव तूं. तूं जर मजपाशीं नाहींस तर माझ्या हातून पराक्रम कसा होईल ? मोहने, तुझ्या हाताचा ह्या मनगटाला स्पर्श कर, आणि शौर्य,—कर्तबगारी—ह्यांत किती भरली आहे, ह्याचा चमत्कार पहा. प्रतापरावासंबंधानें तुझ्या मनांत शंका येत असली, तर त्यांच्या हवालीं माझें सर्व सैन्य करितों, ज्या खजिन्याचा पादशहाला एवढा हेवा वाटतो, तो खजिना त्यांना देतों, ते विजापुरच्या तक्ताचे तुकडे करूं देत, विजयानगरला पुन्हां नवी गादी स्थापूं देत, माझी हरकत नाहीं. ते विजयानगरचे भक्त आहेत, तुझे भक्त नाहींत; मी तुझा भक्त आहे. मोहने, तूं माझी हो, माझ्याबरोबर चल. लोक काय म्हणतील ह्याची भीति नको बाळगायला. विजापूर म्हणजे पृथ्वी नव्हे. मला आज्ञा कर, मी बेदरशाही बुडवितों, निजामशाहीला तुझ्या पायावर लोटांगणें घ्यावयास लावतों, मोहने, कांगो ब्रह्मणीच्या तक्तावर तुला नेऊन बसवितों. पुराणांतरींहि क्षत्रियांनीं दाखविला नसेल

असा पराक्रम करून दाखवितों. मात्र ह्या मनगटाला तुझ्या कोमल हाताचा स्पर्श झाला पाहिजे. [ जवळ जाऊं लागतो.

**मोह०**:—हं ! हंबीरराव, मी येथें एकटी आहे असें समजून अशी दांडगाई करितां काय ? खबरदार एक पाऊल पुढें याल तर. तुमच्या उद्दामपणाबद्दल शिक्षा करणारे खानाचा समाचार घेऊन विजयी होऊन परतले पहा ! सर्वांदेखत तुमची मानखंडना होऊं नये, अशी जर तुमची इच्छा असेल, ह्या अपराधाबद्दल होणारी भयंकर शिक्षा तुम्हांला जर चुकवावयाची असेल, तर विजयी लष्कर गडावर येऊन पोंचण्यापूर्वी मुकाट्यानें एकदां काळें तोंड करा, कांचनगडावर जरी मोहना एकटी— [ पडद्यांत एक भयंकर आवाज होतो.

**हंबी०**:—मोहने, कांचनगडची आतां प्रतिष्ठा कशाला ? हा पहा, पूर्वेकडचा तुमचा तो जंगी बुरूज एकदम जमीनदोस्त झाला ! मोहने, ही तुमच्या दारूच्या कोठाराला पिलाजीरावानें लावलेली आग आहे. आतां कांचनगडाला कोण भिणार ?

**मोह०**:—कसायांनो, चांडाळांनो, हरामखोरांनो, दगा करून आमचा सर्वांचा केसानें गळा कापलांत अं ? चांडाळा, पाप्या, पतिव्रतेचा तूं छळ मांडिला आहेस. कांचनगडच्या पूर्वेच्या त्या बुरुजाप्रमाणें तुझ्या शरीराचे कळपे कळपे तुटून पडून मेल्या तुझा नाश होईल. दारूच्या कोठारांत सांपडून जळून होरपळून, तुला मृत्यु येईल ! जगदंबे, कांचनगडाबरोबरच तिकडचे सर्व बेत कोसळून गेले ना ? आणि हें सर्व माझ्या पायीं ! हंबीरराव, मोहनेचा असाच जर सूड तुम्हांला उगवायचा होता तर मोऱ्यांच्या हिरव्या महालांतच माझ्या उरांत खंजीर खुपसून मला ठार कां मारिली नाहीं ? माझा सूड घेण्याकरितां, दारूच्या कोठारावर मला बसवून माझ्याच हातानें जर तुम्हीं बत्ती लावावयास सांगितलें असतें,—अशा ह्या ज्वालेंत—अशा ह्या कडाक्यांत कांचनगडाशिवाय इतर कोठेंहि माझे जरी तुकडे तुकडे झाले असते, तरी मीं तुम्हांला दुष्ट देखील म्हटलें नसतें ! पुण्यश्लोक सरदारांची आशा या कपाळकरंटीच्या पायीं, देवा, अशा रीतीनें भंग व्हावी ना ? देवा ! खानाचा पराभव करून ते वर येऊं लागले आणि कांचनगडावर असा हा प्रळय ! आग लावतांना त्या मान्याचा हात झडून कसा गळून पडला नाहीं ? मेल्यांनो, आमचा सूड तुम्हीं उगवलात, पण पतिव्रतेच्या भयंकर शापांतून तुमची सुटका होणार नाहीं ! देवा, ज्या

हातांनीं हा कसाईपणा केला, ज्या हलकट पुरुषांनीं हें दुष्ट कारस्थान केलें, त्या सर्वांना—काय प्रळय हा !

**हंबीo:**—मोहने, विनाकारण त्रास करून घेण्याची ही वेळ नव्हे. माझ्या हातून जर कांहीं पातक झालें असेल तर त्याला कारण तुझ्यावरचें प्रेम. मोहने, आज नाहीं उद्यां तुला माझ्या छावणींत आलेंच पाहिजे. आतां माझ्याबरोबर चल. तुझी इच्छा असेल तर जेथें आपल्या ओळखीचे लोकहि भेटणार नाहींत अशा देशांत जाऊं चल, उत्तरहिंदुस्थानांत जाऊं. दिल्लीच्या पादशहाला तक्ता-वरून ओढून काढून हस्तिनापूरच्या पांडवांच्या सिंहासनावर तुला बसवितों. रामाच्या अयोध्येंतून ह्या यवनांना हाकलून लावून, सितादेवी ज्या महालांत राहत होती, त्याच महलांत तुला नेऊन ठेवितों. ह्या कांचनगडची प्रतिष्ठा काय ? ह्या कांचनगडासारखे हजारों किल्ले गंगेच्या तीरावर बांधूं. चल मोहने मजबरोबर. ह्यांत कोणचेंच वाईट नाहीं. ह्यांत पाप नाहीं. धर्मसेवा होतेच आहे. मोहने, हंबीररावाचा स्वीकार करून त्याला आज्ञा कर—

[ अगदीं जवळ जातो.

**मोहo:**—पाप्या, कांचनगडाच्या ठिकऱ्या, ठिकऱ्या झाल्या, प्रतापराव कितीही दूर असले, तरी मोहना एकटी आहे असें समजूं नको.

**हंबीo:**—तिचें संरक्षण करणारा तिचा बंदा सेवक हा हंबीरराव जवळ असतांना मोहना एकटी ! [ धरूं पाहतो.

**मोहo:**—( बुरुजाच्या बाहेरच्या कठ्ड्यावर एक पाय ठेऊन दुसरा खालीं सोडून एका हातानें कठडो धरून ) मोहनेचें संरक्षण करण्याची कोणाला जरूरी नाहीं. तिचें संरक्षण करण्याला तिचें पातिव्रत्य तयार आहे. नीचा, केसभर पुढें ये, मोहनेचा कठड्याचा हात सुटलाच म्हणून समज.

**हंबीo:**—( मागें सरून ) मोहने, असें साहस करूं नको. अशानें तुझ्या शरीराचे नव्हे, माझ्या शरीराचे शतशः तुकडे होतील.

[ पिलाजीराव येतो.

**पिलाo**—हंबीरराव, गडावरून खालीं चला लवकर. बायकांचीं आर्जवें करण्याची ही वेळ नव्हे. उद्यां हीच मोहना तुमचीं आर्जवें करूं लागेल ! तुम्हांला स्वर्गांतले देव समजूं लागेल ! चला एकदम, आतां आमच्या सैन्यांत आम्हांला गेलें पाहिजे.

**हंबी०**:—मोहनेशिवाय मी एकटा यावयाचा नाहीं.

**पिला०**:—आज मोहना तुमची नव्हे, उद्यां मोहना तुमची. प्रतापराव वर येण्यापूर्वी आम्हांला येथून गेलें पाहिजे, व एकदम या पडक्या गडाला वेढा दिला पाहिजे. आतां वेळ घालविली कीं, मोहना हातची गेली. चला, अहो ज्यांनीं कांचनगडचा किल्ला क्षणांत जमीनदोस्त केला, त्यांना पातिव्रत्याचा आव घालणाऱ्या ह्या मोहनेला वश करून घ्यायला काय उशीर ! पण कोणचीहि गोष्ट योग्य वेळीं केली पाहिजे. [ पिलाजी हंबीररावास घेऊन जातो.

**मोह०**:—( वर बघून, ) गेले मेले कसाई ! काय अनर्थ हा ! हंबीरराव, तुम्ही मला धरायला आतां पुढें येत होतां तसेच केसभर पुढें कां नाहीं आलां ? ह्या कड्यावरून मोहनेनें जर उडी घेतली असती आणि मोहनेच्या शरीराचे जर तुकडे झाले असते तर, देवा, किती तरी चांगलें झालें असतें ! प्रतापराव, तुम्हांला वाटत असेल, मी विजयी होऊन आलों म्हणजे माझी मोहना मला आरती ओंवाळायला येईल. महाराज, ह्या हतभागी, पापी, दुर्दैवी मोहनेशीं ज्या वेळीं लग्न लावलेंत त्याच वेळीं,—आपण परवां म्हणत होतां त्याच वेळीं,— आपणावर दुःखाचे डोंगर कोसळून घेतलेत ! शत्रूला जिंकून तुम्ही गडावर परत आलां म्हणजे रत्नखचित निरांजनांची आरती हातांत घेऊन तुमच्या यशाचें शुभ्र तेज तुमच्यापुढें ही दुर्दैवी मोहना आतां आणीत नाहीं, तर मोहनेच्या पायीं तुमच्या गडाचे तुकडे तुकडे होऊन, त्यांतून निघणारा हा काळाकुट्ट धूर, ह्या भयंकर ज्वाळा आरतीचे ऐवजीं तुम्हांला पहाव्या लागणार ! देवा मला जन्माला घालून, माझ्यामुळें, माझ्या पायीं, त्यांच्यासारख्या नरवीरांच्या हालअपेष्टेस प्रारंभ केलास, त्यापेक्षां मला जन्मालाच घातली नसतीस, तर फार बरें झालें असतें ! [ पडदा.

---

## प्रवेश दुसरा.



**स्थळ**—पिलाजीरावाची छावणी.

[ पिलाजीराव व दोन सरदार प्रवेश करतात. ]

**पिला०**:—कांचनगडाबरोबरच खानाचाहि नाश झाला म्हणायचा. प्रतापरावाकडे गडावर गेलेला जासूद अद्याप नाहीं परत आला ?

**पहि० सर०**:—अद्याप नाहीं आला. आपल्या आज्ञापत्राचें उत्तर प्रताप-रावांनीं लवकर दिलें नसेल.

**दुस० सर०**:—सरकारांनीं हुकूम फर्माविल्याप्रमाणें प्रतापराव जर शरण आले तर त्यांना—

**पहि० सर०**:—मोहित्यांच्या सोनगडाकडे आपण त्यांना जाऊं दिलें— .

**पिला०**:—प्रतापराव शरणहि येत नाहींत आणि सोनगडाकडे जिवंत सोडा-वयाचे किंवा कसे ह्याचीहि पंचाईत नको. ( राघोजीराव व दोघे इसम निशाणा-सह प्रवेश करतात. ) या, दोस्त राघोजीराव, या. तुम्हांला पाहिलें म्हणजे खानसाहेबांची मला आठवण होते, आणि डोळ्यांचें पाणी कांहीं केल्या थांबतच नाहीं. एवढा कांचनगड मीं एका क्षणांत धुळीस मिळविला, प्रतापरावालाहि आज जिवंत धरून मुसक्या बांधून विजापुरास नेईन; पण राघोजीराव, खाना-शिवाय कोणत्या तोंडानें आह्मीं पादशहाच्या भेटीस जावें ?

**राघो०**:—सरदारसाहेब, खानाकरितां दुःखाश्रू गाळीत बसण्याची ही वेळ नव्हे. कालच्या छाप्यांत खान व त्याच्या गोटांतले सर्व सरदार कापले गेले—

**पिला०**:—हाय ! हाय ! हा पिलाजी माने जिवंत असतांना खानाला व त्याच्या सरदारांना ह्या चोर, लुटारू, दरवडेखोर प्रताप्यानें छापा घालून मारावें अं !

**राघो०**:—सरदारसाहेब, शोक करूं नका. खानाचें सैन्य अनाथ झालें आहे, नांवाजलेला सरदार खानाचे छावणींत कोणीच जिवंत राहिला नाहीं. मीं निजा-मतींतला नोकर, सरदार मंडळींत माझें नांव नाहीं. लष्कराच्या दृष्टीनं मीं जिवंत असूननसून सारखाच. तेव्हां ह्या सर्व पादशाही सैन्याच्या सरलष्करचें हें निशाण आपल्या तंबूजवळ रोंवण्याचा मला हुकूम करून सर्व सैन्यास आपण सनाथ केलें पाहिजे.

**पिला०**:—राघोजीराव, खानाच्या मागें लष्कराचा मान मला आपण देतां, आपल्या उपकाराची फेड माझ्या हातून होईल तेव्हां खरी. पण असे पहा, पाद-शाही सैन्यांत हंबीरराव दसहजारी आहेत आणि मी पंचहजारी आहे; तेव्हां हंबीररावांना प्रथम हा मान मिळाला पाहिजे.

**राघो०**:—हंबीररावांच्या डेऱ्याकडे प्रथम जाऊन मगच आपल्या तंबूकडे आलों.

**पिला०**:—मग हंबीरराव काय म्हणाले ?

[ पडद्यांत गलबला.

**राघो०:**—ते पहा हंबीरराव आणि त्यांचे लोक इकडेच येत आहेत. तेथला गोंधळ आतां तुम्हांला येथेंच पहावयाला मिळेल.

**पिला०:**—( स्वगत ) धन्य पिलाजीराव, आज तुम्ही धन्य आहां: हें पादशाही वैभव, हें निशाण, आपल्याच पायानें तुमच्याकडे चालून आलें आहे ! वळणावळणानें असें पाणी बांधून आणावें लागतें.

[ हंबीरराव व त्याचे दोन सरदार प्रवेश करितात. हंबीर-रावाचे सरदार निशाणाला हात घालतात. ]

**हंबी०:**—काय वेडे लोक आहेत हे ! तुम्हांला माझे हुकूम मानावयाचे नाहींत ? माझे न माना, पण मोहनेचे तरी मानाल कीं नाहीं ? चला परत डेऱ्याकडे.

**हंबी० चे सरदार०:**—पिलाजीराव, हे पादशाही सरलष्कराचें निशाण आमच्या सरकारच्या डेऱ्याजवळ पाहिजे.

**पिला०:**—अलबत, मी झालों तरी तेंच ह्या राघोजीरावांना सांगत होतों. हंबीरराव आमचे धनी, खानाच्या मागें सरलष्करचा मान त्यांचा. हंबीररावसर-कार—आम्ही सर्वजण हें निशाण—

**हंबी०:**—माझ्या तंबूजवळ आणि हें पांढरें फडकें, काय करायचें ? ह्याच्या वर मोहनेचें जर चित्र असतें, आणि वाऱ्याच्या झुळकीसारखा मोहनेच्या मोहक मूर्तीचा डोल झालेला ह्या निशाणावर जर मला पहावयास मिळाला असता—चला, माझा हुकूम माना. माझ्या तंबूच्या प्रत्येक कनातीवर मोहनेचें चित्र काढा.

**पिला०:**—हंबीरराव, मोहनेचें हें वेड—

**हंबी०:**—मोहनेचें नांव ऐकल्यावर मी जर वेडा बनलों नाहीं, माझी विचार-शक्ति जर जाग्यावर राहिली, तर मोहना मोहक नाहीं, मोहनेंत जादू नाहीं, असें तुम्ही म्हणाल. छे ! सरदारहो, मला जगानें खुळा, वेडा म्हटलेलें पुरवलें. पण मोहनेच्या अंगीं हंबीररावांना वेडा बनविण्याची शक्ति नाही असें नको कोणी म्हणायला. चला तुम्ही माझ्याबरोबर. मी तुम्हांला मोहना दाख-वितों. मग माझ्या निशाणावर, माझ्या तंबूवर, माझ्या मंदिलावर, माझ्या दुशा-लेवर, सर्व ठिकाणीं मोहनेचीं चित्रें काढा. पण मग असे होईल हो ! नका येऊं तुम्ही माझ्याबरोबर. तुम्ही मजबरोबर आलांत आणि मोहनेचें प्रत्यक्ष दर्शन



हंबी०:——माझ्या तंबूजवळ आणि हें पांढरे फडकें काय करायचें ? [ पृ० ६०

घेतलेंत तर माझ्यासारखे तुम्हीहि वेडे होऊन तुम्हांला तसबीर काढतां याव-याची नाहीं, येथेंच थांबा. मीच मोहनेला पाहून येऊन तुम्हांला सांगतों.

[ हंबीरराव जातो.

**पिला०:**—( हंबीररावाच्या सरदारांजवळ जाऊन दोघांच्या खांद्यावर हात ठेवून ) हें पहा, धनीसाहेबांचें चित्त कांहीं स्थिर नाहीं. तेव्हां आजचें लढाईचें काम ह्यांच्या हातून कांहीं नीट पार पडणार नाहीं. तुम्ही त्यांच्याजवळ नेहमीं असणारे म्हणून ह्या वेडांतून त्यांना सोडविण्याची तुम्हांला एक युक्ति सांगणार आहे. नाहींतर असें करा, हें निशाण तुम्ही आपल्या ताब्यांत घ्या. आणि आज-च्या लढाईचा बोजाहि तुम्ही—

**हंबी० चे सरदार०**—छे ! छे ! तें नको आम्हांला. युक्ति काय सांगत होता ती सांगा.

**पिला०:**—युक्ति म्हणजे अशी, प्रतापराव गडावरून खालीं उतरूं लागले म्हणजे पांचपन्नास निवडक जवान बरोबर घेऊन त्यांच्या पिछाडीस जा. जरा टेहळणी केलीत म्हणजे मोहना कोठेंतरी तुम्हांला सांपडलीच पाहिजे. धनीसाहे-बांच्यापुढें तिला आणून उभी करा, कीं त्यांचें वेड नाहींसें झालेंच म्हणून समजा.

**हंबी० चे सरदार:**—बरोबर आहे; बरें तर आम्ही त्या उद्योगाला लागतों धनीसाहेबांना प्रथम जपलें पाहिजे. [ हंबी० चे सरदार जातात.

**पिला०:**—( स्वतःचे सरदारांस ) हें निशाण माझ्या तंबूजवळ रोंवा, आणि सर्व पादशाही सैन्यांत द्वाही फिरवा कीं, सर्व सरदार एका ठिकाणीं जुळून, सर्वांची सल्लामसलत होऊन हंबीररावांची तब्बेत नादुरुस्त असल्यामुळें खानाच्या मागें सरलष्कराचा मान पिलाजीराव मान्यांना देण्यांत आला आहे. जा, ह्या उद्योगाला अगोदर लागा. ( पिला० चे सरदार व निशाणवाले जातात. ) सर-दार राघोजीराव, सरलष्कराचा हा अधिकार हातांत घेतांना पादशहाच्या नांवानें मीं माझी पंचहजारांची सरदारकी तुम्हांला आतां दिली आहे.

**राघो०:**—हें काय पिलाजीराव, माझा येवढा मोठा सन्मान करण्यासारखें मीं काय केलें आहे ?

**पिला०:**—तुम्हीं नसलें केलें तर आज तसेंच कांहीं करून दाखवावें लागेल.

**राघो०:**—सरलष्करचे हुकूम पाळायला हा बंदा तयार आहे.

**पिला०:**—हंबीररावाला सरलष्कराचें निशाण तुम्ही द्यावयाला गेला होतां

आणि त्यानें त्या निशाणाचा अपमान केला; पादशाहीविरुद्ध हंबीऱ्यानें हें बंड नाहीं कां केलें ?

**राघो०:**—बंड कसलें, त्यांना मोहनेचें वेड—

**पिला०:**—अहो, कांचनगडाच्या छावणींत असतांना हंबीरराव वेडे खरें—पण पादशहापुढें गेल्यावर ते बंडखारच ठरलें पाहिजेत.—असें काय करतां! त्यांची दसहजारीची जहागीर रिकामी नको कां व्हायला ?

**राघो०:**—समजलों, आलें ध्यानांत. विजापुरला गेल्यावर हंबीऱ्याला बंड-खोरांत ओढायचें. बरें आज मी काय करूं ?

**पिला०:**—आतां कसे ठीक बोललां! आज असें करायचें, हंबीररावाचे सरदार मोहनेला हुडकावयाला निघून गेले म्हणजे तुम्ही बंदोबस्तानें हंबीररावाचे डेऱ्यांत शिरून, हंबीरराव आणि त्यांची बायको यमुना यांना गुप्तपणें मेण्यांत घालून कैद करा. आणि असें करा—मग सांगेन आतां तुम्ही जा. तशी व्यवस्था झाली म्हणजे मला वर्दी द्यायला या. (राघोजी जातो.) प्रतापराव आणि मोहना, ह्यांना कसेंहि करून जिवंत धरण्याचा प्रयत्न केला पाहिजे. प्रतापराव जिवंत हातीं लागला नाहीं तर त्याचें निदान शीर कापून आणून विजापुरास नेलें पाहिजे. एका वेशीवर रामराजे टांगलेले आहेत तर दुसऱ्या वेशीवर हे जाधव-कुळांतले सरदार चांगले शोभतील. [ पडदा.

---

## प्रवेश तिसरा.



**स्थळ**—कांचनगड.

[ प्रतापराव व दवलतराव येतात. ]

**प्रता०:**—दवलतराव, विजापुरकराशीं लढण्याचा ज्या वेळीं मीं प्रथम निश्चय केला त्या वेळीं आमचेच लोक विश्वासघातानें आमचा असा गळा कापतील असें माझ्या स्वप्नींहि आलें नव्हतें ! शत्रूची लक्षावधि फौज कांचनगडावर चालून आली असती, आम्हांला जिंकून कांचनगडाचे तुकडे तुकडे करून सर्व मैदान बनविलें असतें, आणि त्याच मैदानावर कत्तल करण्याकरितां उभे केलेल्या कांचन-

गडाच्या गडकऱ्यांच्या दावणींत मला बांधलें असतें, तरीसुद्धां हृदयावर अपमानाच्या असह्य डागण्या देणाऱ्या त्या मृत्यूला माझी ही मान देतांना आतांच्याइतकें खात्रीनें वाईट वाटलें नसतें !

**दव०**:—प्रतापराव, कांचनगडची राखरांगोळी होऊन गेली; झाली ही गोष्ट होऊन गेली. आतां तीबद्दल दुःख करीत बसण्यांत काय अर्थ आहे ? पुढील प्रसंग याहूनहि भयंकर आहे. त्यांतून पार कसें पडावें, ह्याची एखादी मसलत काढूं या.

**प्रता०**:—ह्या घरभेद्या मात्रागमनी मांगांच्या मायावी जाळ्यांतून पार पडण्यास मार्ग सांपडेल, असें दवलतराव तुम्हांला वाटतें तरी कसें ?

**दव०**:—पण प्रतापराव, कांचनगडावर आम्हांपैकीं बऱ्याच जणांच्या बायका आहेत. त्यांची जाधवांचे नांवाला शोभेल अशी कांहींतरी व्यवस्था लावायला नको काय ?

**प्रता०**:—हो सर्व खरें. पण जी व्यवस्था आम्हीं केली आहे, त्याहून अधिक तें आम्ही काय करणार ? दवलतराव, शत्रूची कोण कडेकोट तयारी ही ! कांचनगडावर हा प्रळय व्हायची फुरसत, तों मान्यांच्या सैन्यानें कांचनगडाला सक्तीचा वेढा दिला ! कांचनगडाच्या पायथ्याचा खडक कोसळून पडायचा थांबला असेल नसेल, तों हंबीररावांच्या आज्ञेवरून मान्यांची ती उर्मटपणाची चिठ्ठी आली ! दवलतराव, ज्या ठिकाणीं घरचे विश्वासाचे लोक आपणांस निजल्या जागीं ठार करण्याचे उद्योगांत असतात, त्या ठिकाणीं ओढवलेल्या संकटाशीं टक्कर देऊन सोक्षमोक्ष करून घेतल्याशिवाय इलाज नाहीं.

**दव०**:—होय, दुसरा मार्गच उरला नाहीं. पिलाजीरावानें आपल्या चिठ्ठीत लिहिलें आहे, दोन प्रहर दिवस येईतों जे कोणी शस्त्रास्त्रें खालीं ठेवून आमच्या छावणींत येतील, त्यांना पुढें मर्जीस येईल तिकडे जाण्यास आम्ही मनाई करणार नाहीं. ह्या सवलतीचा कितपत उपयोग होईल ? कांचनगडावरून अशा प्रकारें शरण गेलेल्यांना कैद करून विजापुरास नेतील काय ?

**प्रता०**:—अहो, विश्वासघात करण्याचें ह्यांना बाळकडूच घातलेलें आहे ! पादशहा आपणाकडे पाहून जरा हांसलासें यांना वाटलें, आपला काडीचा फायदा होतो आहे अशी यांची समजूत झाली कीं, तेवढ्या क्षुल्लक नफ्याकरितां, आज दिगंतीं कीर्ति गेली आहे अशा घराण्यांतील पवित्र बायकांच्या अब्रूवर रखरखलेले निखारे ठेवण्यास ह्यांच्या मनाला दिक्कत वाटावयाची नाहीं ! दवलतरांव,

खानाच्या पांच हजार पठाण अरबांपैकीं एक हजार लोक उगीच आमच्या तलवारींना आम्हीं बळी दिलें ! या माझ्या तलवारीला काल खानाच्या रक्तानें मीं न्हाऊं घातलें, त्यापेक्षां एखाद्या पित्यावर—एखाद्या हंबीऱ्यावर—ही तीक्ष्ण धार पडली असती, तर विजयानगरच्या ऋणांतून मीं बऱ्याच अंशीं मुक्त तरी झालों असतों. शत्रूला शरण जाऊन पाहिजे तर कांचनगडावरील सर्व गडकरी आपले प्राण वांचवूं देत, माझा हाच निश्चय, हीच प्रतिज्ञा, कीं तलवारींच्या तीक्ष्ण धारांनीं माझ्या शरीराचे तुकडे तुकडे होवोत, भाल्यांच्या माऱ्यांमुळें माझ्या शरीरांतून रक्ताचे हजारों प्रवाह वाहोत, बंदुकींच्या गोळ्यांच्या तडाक्यानें माझ्या मस्तकाचे कळपे कळपे तुटून पडोत, ही माझी भयंकर तलवार वज्राप्रमाणें शत्रुसैन्यावर पडेल, आणि ह्या चोरांची राखरांगोळी झालेली ह्या डोळ्यांनीं पाहिल्याशिवाय किंवा कानांनीं ऐकल्याशिवाय प्रतापरावाचीं हाडें कांचनगडच्या मैदानावर कधींहि पडावयाचीं नाहींत. [ संताजीराव येतो.

**दव०**:—या संताजीराव, कालच्या प्रळयांत किती गडकरी पडले, नक्की वातमी काढलीत का ?

**संता०**:—होय; दोन हजार मेले व चारपांचशें दुखावले आहेत.

**प्रता०**:—आतां आमचे एकंदर सैन्य किती शिल्लक राहिलें, व शत्रूचें किती आहे ?

**संता०**:—शत्रूंच्या पंधरा हजार सैन्यांपैकीं कालच्या छाप्यानें काय हजारभर कमी झालें असेल तेवढेंच; शिवाय चौदा हजारांत खानाच्या वधामुळें चिडलेले चार हजार पठाण अरब आहेत. लढाई देण्याला लायक असे आमचे दोन अडीच हजार लोक आहेत. पण दवंडीमुळें बायकांपोरांबरोबर चारपांचशें लोक तरी काळें तोंड करतीलसें वाटतें.

( पडद्यांत दवंडीचें झंगट—" कांचनगडावरील तमाम गडकरीहो, आज दोन प्रहर दिवस येईतों कांचनगडावरील जे कोणी शस्त्रें खालीं ठेवून, आमच्या गोटांत येतील, त्यांना पुढें जाऊं देऊं, अशी शत्रूची चिठ्ठी आली आहे. ज्या कोणास शत्रूस शरण जाऊन प्राण वांचवावयाचे असतील, त्यांना तसें करण्यास प्रतापरावांची बिलकूल आडकाठी नाहीं. शत्रूशीं लढून समरांगणावर देह ठेवण्यांतच ज्यांना पुरुषार्थ वाटत असेल त्यांनीं प्रतापरावाबरोबर शत्रूच्या अंगावर चालून जाण्याकरितां दोन प्रहराबरोबर पश्चिम वेशीपाशीं हजर असावें हो ! " झंगट. )

**प्रता०**:—कोणाच्या हुकुमानें ही दवंडी पिटली ? अर्धा कांचनगड अद्याप

या मैदानावर उभा आहे, प्रतापरावाचीं हाडें मैदानावर पसरलीं नसून तीं अद्याप एके ठिकाणीं उभीं आहेत, असें असतांना शत्रूला शरण जाण्याचा उपदेश प्रताप-रावाच्या गडकऱ्यांना करणारा एवढा धाडसी कोण ?

**संता०:**—सरकारच्याच आज्ञेवरून दवंडी पिटविण्यास मीं सांगितलें. शत्रू-कडील चिठ्ठी आली त्या वेळीं मी सरकारच्या जवळ होतों, व अशी अशी द्वाही फिरवा म्हणून सरकारांनीं शांतपणें विचार करून मग मला आज्ञा केली.

**प्रता०:**—होय, मीं सांगितलें खरें! दवलतराव, कांचनगड सोडून एकदम येथून निघून जाण्यास कांहीं सवड आहे काय, म्हणून टेहळणी करण्यास तुम्ही त्या वेळीं गेलां होतां, आणि मला कायसेसें वाटून ही द्वाही फिरविण्यास मीं संमति दिली. कांचनगड सोडण्यास अद्याप दोन प्रहर अवकाश आहे. द्वाही-प्रमाणें आपले प्राण ज्यांना वांचवावयाचे असतील, त्यांना प्रहर दिवस यावयाचे आंत कांचनगडावरून खालीं हांकलून लावा. विजयानगरचे जे खरे पुत्र असतील, त्यांनीं आपल्याजवळचीं सर्व हत्यारें व दारूगोळा बरोबर घेऊन, दोन प्रहरा-बरोबर पश्चिमवेशीपाशीं दाखल व्हावें.

**दव० व संता०:**—दीडप्रहर दिवसालाच सर्व गडकरी घेऊन आम्ही वेशी-पाशीं हजर आहों म्हणून समजा. [ दव० व संताजी जातात.

**प्रता०:**—( स्वगत ) विजयानगर कधींतरी स्वतंत्र होईल काय ? दोन तीन प्रहरांपूर्वीं शत्रूच्या लक्षावधि फौजेपुढें उभा राहून, रामराजाचे वंशजांना कैदेंतून सोडवीन व विजयानगरचें तख्त पुन्हां खात्रीनें स्थापीन, अशी मीं प्रतिज्ञा केली असती! पण आतां? नको ते शब्द! देवा, माझ्या तोंडून ते शब्द काढूं नको. पिलाजीराव, हंबीरराव, मलाच पुढारीपणाचा मान कां द्यावा, अशी कल्पना तुमच्या मनांत उत्पन्न होऊन जर तुम्हीं असें केलें असेल, तर असा केसानें गळा कापण्यापूर्वीं एका शब्दानें मला तसें सुचवायचें होतें, तुमचा—नोकर बंदा—म्हणून मी शत्रूच्या अंगावर तुटून पडलों असतों. पादशाही राज्य नाहींसें होऊन, त्या जागीं उभारलेल्या हिंदुपदपादशाहीपुढें, केवळ वेत्रधारी होऊन उभे राहण्यांत प्रतापरावास खरोखरच कृतकृत्य वाटलें असतें. सातआठ वर्षें कांचनगडावर एवढी खस्त खाल्ली, मोहनेसारख्या स्त्रीरत्नास सतत दुःखांत—( चंपा येते. ) अरे, ही मोहनेची दासी मजकडेच येत आहे. माझ्या दुःखाच्या कडे-लोटाची वेळ मी मुद्दाम म्हणून लांबणीवर टाकीत असतां, अंगावर कोसळणाऱ्या

दुःखांच्या पर्वतापासून जाणूनबुजून अंग चोरीत असतां, मला बळजबरीनें दुःखाजवळ ओढून नेण्यास ही आली असावी ! चंपे, कोठें चाललीस ?

**चंपा**:—सरकारस्वारी काय करीत आहे हें पाहून ये, म्हणून बाईसाहेबांनीं आज्ञा केल्यावरून इकडे आलें.

**प्रता०**:—मोहना काय करीत आहे?

**चंपा**:—डोळ्यांतून एकसारखें पाणी चाललें आहे, त्या झाल्या तरी दुसरें काय करणार ?

**प्रता०**:—हा मी आलोंच तिकडे. ( चंपा जाते. ) प्रतापराव, वज्राहून हृदय कठोर करा, मांग, पिशाच्च, राक्षस, यांच्यांहून अधिक निर्दय व्हा, आणि मग मोहनेच्या महालांत पाय टाका; पादशहाच्या जुलमामुळें क्रुद्ध झालेल्या विजयानगरच्या देवतांना, गांजलेल्या तुमच्या धर्माला, तुमचा स्वतःचा बळी देण्यास तुम्ही तयार झालेंच पाहिजे.

---

## प्रवेश चवथा.



**स्थळ**:—मोहनेचा महाल.

[ मोहना सचिंत बसली आहे. ]

**मोह०**:—जगदंबे, असें माझ्या हातून कोणाचें पाप झालें, म्हणून माझ्यावर एवढा राग केलास ! मला पापिणीला जन्माला घालून, माझ्याबद्दल प्रतापरावांसारख्या सरदारांच्या मनांत प्रेम उत्पन्न करून, माझ्यापायीं त्यांच्या सर्व सुखाची नासाडी केलीस, याहून दुसरी शिक्षा माझ्या पापाबद्दल नव्हती का ? (प्रतापराव येतो व जवळ जाऊन मागें उभा राहतो. ) प्रतापराव, माझें मुख्य दैवत आपण, माझें सर्व सुख आपण, माझ्या जिवाचा विसावा आपण, माझा मोक्ष आपण, माझें परब्रह्म आपण; प्रतापराव, आपणांवरचें माझें प्रेम स्वप्नांतसुद्धां कधींही चुकून जरा देखील ढळलें नाहीं; तें प्रेम आठवा, आणि या गरीब दासीमुळें आपणावर ओढवलेल्या ह्या भयंकर प्रसंगाबद्दल तिला क्षमा करा.

**प्रता०**:—( पुढें होऊन ) मोहने, तुझीच क्षमा मागण्याकरितां पदर पसरून हा प्रतापराव तुजजवळ उभा आहे.

**मोह०:**—( उठून ) महाराज, हें काय ? मी अपराधी आणि माझी काय म्हणून क्षमा मागायची ? ( जवळ जाऊन ) ह्या दासीचा आपणांला तिटकारा नाहींना आला ? मोहनेचा आपणांला राग नाहींना आला ? ह्या दासीवरचें आपलें प्रेम आहे तसेंच आहेना ? जगदंबे, विनाकारण मीं आतां तुला दोष दिला ! मजसारखी धन्य स्त्री पृथ्वीवर दुसरी कोणीहि सांपडणार नाहीं !

**प्रता०:**—मोहने, मजसारख्या दुर्दैवी, अपेशी पुरुषाचे प्रेमांत धन्य मानण्यासारखें काय आहे ? माझी धनदौलत, माझा अभिमान, माझा दरारा, ह्या कांचनगडांत भरलेला होता; ज्या वेळीं गड कोसळला,त्या वेळींच माझ्यांतील सर्व चांगल्या गुणांचा लोप झाला. माझ्या प्रेमांत आतां आनंद मानण्याजोगें काय उरलें आहे ? मोहने, शत्रूवर आवेशानें तुटून पडून समरांगणावर देह ठेवून, वीरांची अक्षय कीर्ति मिळविण्याचा हुकूम माझ्या शरीरास करण्यापूर्वीं, माझा आत्मा तुझ्याभोंवतीं घुटमळत आहे. मोहने, तुझी शेवटची गांठ घ्यावी, मीं तुझा जो छळ केला असेल, तुला जें दुःख दिलें असेल, तें सर्व मजवर कृपा करून विसरून जा, अशी तुला शेवटची विनंति करावी, एवढ्याचकरितां मी आतां ह्या महालांत आलों. ( पडद्यांत दवंडीचें झंगट व दवंडी पूर्वोक्त ) मोहने, ही दवंडी तूं ऐकलीसच. बरेच गडकरी आतां कांचनगड सोडून जातील. वेषांतर करून त्यांच्या बरोबर तूं गेलीस व सोनगडास पोंचलीस, तर माझ्या मागें माझ्या मोहनेचें काय होईल, ही तरी मला काळजी राहणार नाहीं.

**मोह०:**—नाहीं; महाराज, नाहीं. मी आपल्याला सोडून सोनगडाला जायची नाहीं. तलवार कशी धरावी, भाला कसा फेंकावा, हें सर्व मी लहानपणींच शिकलें आहे. तेव्हां हुजऱ्याचा पोषाख देऊन मला जर लढाईंत बरोबर येऊं दिली, तर माझ्या हातून अखेरपर्यंत आपली सेवाचाकरी तरी होईल.

**प्रता०:**—मोहने, लढाईला प्रारंभ झाला, तलवारी म्यानांतून बाहेर झळकल्या, आणि पहिली चकमक झाली कीं, भीतीनें तुझे डोळे आपोआप मिटतील, शत्रूच्या निकराच्या हल्ल्याचे वेळीं तूं बेशुद्ध होऊन पडशील, आणि अशा स्थितींत जाधव कुळाची सर्व अब्रू कदाचित् शत्रूच्या हातीं सांपडेल. नाहीं, ह्याला मी कधींहि रुकार देणार नाहीं.

**मोह०:**—महाराज, जाधव कुळाची अब्रू मलीन होईल, अशी आपण नका बाळगायला. माझ्या ह्या विनंतीस रुकार तरी द्यावा, किंवा दिल्ली शहानें रजपुतांच्या किल्ल्याला वेढा दिल्याची हकीकत आपण ए

मला मुद्दाम वाचून दाखविली होती; तशासारखें जाधव कुळाची अब्रू राखण्याकरितां तरी करावें. फत्तेपूर--शिक्रीस रजपुतांनीं ज्याप्रमाणे केलें, त्याप्रमाणें ह्या पापिणीच्या जीविताचा अंत आपल्या तलवारीनें करा. महाराज, आपण जिवावर उदार होऊन शत्रूशीं लढून, समरांगणीं वीरांची अखेरची कीर्ति मिळविल्यावर स्वर्गलोकच्या अप्सरा आपणांला सामोऱ्या येतील; त्या अप्सरांचा महाराज, मला मत्सर वाटतो. आपल्या हातून मरण आल्यानें माझी पूर्व जन्मींची पापें जळून नाहींशीं होतील; आणि त्या सर्व अप्सरांना मागें लोटून हातांत विजयाची माळ घेऊन, मी आपल्या सामोरी येईन. महाराज, तुमच्यावर निष्कपट प्रेम करणाऱ्या तुमच्या ह्या लाडक्या मोहनेचा हा शेवटचा हट्ट, ही शेवटची हौस, कसेहि करून पुरवा.

**प्रता०**:—भलता हट्ट घेऊन माझ्या जिवाला मात्र असह्य दुःख देत आहेस ! मोहने, शौर्यात रजपुतांना आम्ही मागें सारूं, तोफांच्या व बंदुकींच्या गोळ्यांचा वर्षाव होत असतां पेटलेल्या तोफेवर घोडा घालून, एक हात काऱ्यांतील दारूवर ठेवून, दुसऱ्या हातांतील भाल्यानें गोलंदाजास ठार करूं. मोहने, ह्याहूनहि अघटित भीमकर्मे आम्हीं मराठ्यांनीं करावीत. पण आपल्याच बायकांचा जीव घेण्याचें क्रूरपणाचें काम आमच्या हातून व्हावयाचें नाहीं. रजपूत जसे अब्रूकरितां धडपडतात त्यांच्याहून अधिक तसेंच आम्ही तळमळू; यश मलीन होणार, असें वाटतांच त्यांच्याहून अधिक यातना आमच्या जिवाला होतील; पण मोहने, आम्ही आमच्या बायकांची योग्यता अधिक समजतों. आमच्या बायकांत कर्तबगारी रजपूत स्त्रियांहून खचित अधिक आहे. आपल्या राजाचें, आपल्या घराण्याचें, आपल्या धर्माचें नांव राखण्याकरितां रणांगणावर प्रत्यक्ष कृतांतकाळास कवटाळण्यास आम्ही धांवत जाऊं; पण आमच्या बायकांनीं आपली अब्रू कशी राखावी, हें आम्ही आमच्या बायकांवरच सोंपवूं. मराठ्यांची वहिवाट आजपर्यंतची अशीच आहे. प्राणाहून प्रिय असलेल्या आपल्या लाडक्या पत्नीला हातांनीं लोटून देऊन शत्रूच्या अंगावर तुटून पडण्याचा आम्हां वीरांचा आजपर्यंतचा बाणा आहे; आणि आपली अब्रू रजपूत स्त्रियांहून चांगली राखणाऱ्या पतिव्रतांचीं उदाहरणें आमच्यांत शेंकडों आहेत.

**मोह०**:—मला एकटीलाच येथें सोडून आपण जाणार म्हणायचें एकूण ! महाराज,—

**प्रता०**:—मोहने, बायको, मुलगा, ह्यांच्या मोहांत न गुंततां, मी आपल्या



प्र.—आम्ही आमच्या बायकांची योग्यता अधिक समजतों. [पृ. ६८

कर्तव्याला जागेन, म्हणून बाबांपाशीं घेतलेली शपथ क्षणभरहि मला आतां येथे उभा राहूं देत नाहीं. शेवटचें तुझें दर्शन घ्यावयाचें होतें, —असा शोक करून काय उपयोग? नशिबीं असेल तें मुकाट्यानें सोसण्यांतच मोठेपणा आहे. मोहने, तुझे शेवटचे प्रेमाचे शब्द ऐकावयाचे होते, झालें. सोड मला आतां. जातों मी. (स्वतःस सोडवून घेऊन जाऊं लागतो; मोहना मूर्छित होऊन त्यांच्या पायांवर पडते.) हिला मूर्च्छा आली अं!—चंपे, जरा पाणी आण. (चंपा पाणी घेऊन मोहनेवर शिंपडते.) ह्या महालांतून बाहेर पडण्याइतका, जगदंबे, ह्या वेळीं मला क्रूरपणा दे. सावध होऊं लागली का?

**चंपाः**—बाईसाहेब, महाराज तुम्हांला सोडून कांहीं गेले नाहींत. डोळे उघडून तरी पहा. महाराज, पहा बाईसाहेबांनीं हा हात हालविला. इतक्यांत डोळे उघडतील. [ पाणी शिंपडते.

**प्रता०:**—अशा स्थितींत मोहनेनें मजकडे प्रेमानें पाहिल्यावर, ब्रह्मांडांतला सगळा क्रूरपणा माझ्या एकट्याच्या वांटणीला जरी आला, तरी माझ्या हांतून हिला सोडून जाणें व्हावयाचें नाहीं! चंपे, मोहना शुद्धीवर आल्यावर तिला सांग, ह्या महालांतून बाहेर जातांना, आपल्या पायावर सर्व सृष्टीचें वजन कोणी ठेविलें आहेसें प्रतापरावाला वाटलें. जातों मी. जाधव कुळाच्या देवतांनो ही माझी निराश्रित बायको मीं तुमच्या स्वाधीन केली आहे. विजयानगरचा नाश करणारांचा—माझ्या धर्माचा छळ करणाऱ्यांचा—सूड घेण्याकरितां मी जात आहे. विजयानगरच्या देवतांनो, विजयानगरच्या साधुसंतानो, मोहनेची अब्रू राखण्याचें काम आतां सर्वस्वीं तुमचें आहे [ जातो.

**चंपाः**—बाईसाहेब, सावध व्हा; सावध व्हा.

**मोह०:**—(डोळे उघडून) महाराज,—चंपे, स्वारी गेली का ग? अखेर माझ्याशीं निष्ठुरतेनें वागले ना? (उठून) गेले; मोहने, तुला टाकून गेले! चंपे, जातांना कांहीं बोलले का?

**चंपाः**—होय बाईसाहेब. महाराज आपल्या जवळ बसले, त्यांच्या डोळ्यांतून एकसारखे निघणारे अश्रु आपल्या अंगावर पडत होते;—

**मोह०:**—होय का? खरें का हें?

**चंपा०:**—खरें बाईसाहेब. मीं शिंपडलेल्या पाण्यानें आपण सावध झालां म्हणण्यापेक्षां, आपल्या मुखांवर पडलेल्या त्यांच्या अश्रूंनींच आपण लवकर शुद्धीवर आलां,—

**मोह०**—जातांना काय म्हणाले ग ?

**चंपा**:--आपलें संरक्षण करण्याकरितां, आपली अब्रू राखण्याकरतां परमेश्वराची, जगदंबेची, त्यांनीं प्रार्थना केली; आणि मला गेलेंच पाहिजे, असें म्हणून मोठ्या कष्टानें गेले !

**मोह०**:—महाराजांच्या अखेरच्या त्रासाला मोहना कारण झाली म्हणायची ! मला बरोबर न्या म्हणून ह्या पापिणीनें कशाला बरें हट्ट धरिला ? ऊठ, मोहने ऊठ; तूंही मर्दानी पोषाख कर, आणि महाराजांनीं जरी तुला बरोबर नेले नाहीं, तरी तूं त्यांच्या मागोमाग जा. आमच्या स्त्रिया रजपुतांच्या स्त्रियांहून अधिक तेजस्वी असतात, असेच शब्द स्वारीच्या तोंडून निघाले, नाहीं ? माझी तलवार, माझा भाला बरोबर घेऊन मी कांचनगडच्या सैन्यामागून जाईन, आणि लढाईला सुरवांत झाली कीं, महाराजांच्याजवळ जाऊन शेजारीं लढत राहीन. शत्रूचा मोड करण्यास प्रतापरावांना मोहना मदत करील, किंवा तशी वेळ आल्यास, स्वामीबरोबर, आपलाहि देह रणांगणावर ठेवील. वीरपत्नीला हेंच सहगमन योग्य. चंपे, तुला एक कामगिरी मला सांगावयाची आहे. माझ्या गळ्याची शपथ आहे तुला, ती तूं करशील ना ?

**चंपा**:--बाईसाहेबांचा काय हुकूम आहे ?

**मोह०**:--चंपे, शहाजी एकदीड वर्षाचा असेल, मी त्याला येथेंच खेळवीत होते; आणि स्वारी महालांत आली; त्या वेळचा हूडपणा पाहून महाराजांनीं बळजोरीनें त्या गुलामाला मांडिवर बसवून घेतले, आणि मला म्हणायचें झालें, आमच्या या कटाच्या खऱ्या उद्योगाला कांहीं वर्षांनीं आरंभ झाला, आणि उद्योग शेवटाला जाण्याचे पूर्वींच माझें बरेंवाईट झालें, तर माझा उद्योग हा खात्रीनें पुढें चालवील; मुलगा झाला म्हणजे बापाला आपल्या आयुष्याच्या क्षणभंगुरत्वाबद्दल वाईट वाटत नाहीं; कारण, आपलें सत्त्व चिरस्थायी झालें असें त्याला वाटतें. चंपे, शहाजीची आणि माझी किंवा स्वारीची गांठ पडेल, असें मला वाटत नाहीं. चंपे, तूं आतां सोनगडावर जाऊन माझ्या शहाजीजवळ रहा. तो चांगला मोठा झाल्यावर, त्याला चांगलें कळूं लागल्यावर, त्याच्या आजोबांचे हेतु काय होते ते त्याला चांगले शिकीव, त्याच्या वडिलांनीं कोणचा उद्योग आरंभिला होता तें त्याला कळीव, आणि त्याच्या घराण्यांतील पुरुषांनीं आरंभलेला उद्योग शेवटास नेण्याचा बोजा त्याच्या शिरावर आहे, अशी ह्या मोहनेची--त्याच्या दुर्दैवी आईची--शेवटची आज्ञा--शेवटचा निरोप--शेवटची-- इच्छा—त्याला सांग. [ पडदा.

## अंक चवथा समाप्त.

# अंक पांचवा.



## प्रवेश पहिला.



**स्थळ**—रणभूमि.

( पिलाजी माने व त्याचे दोन सरदार येतात. )

**पिला०**:—आम्हीं पूर्वीं ठरविल्याप्रमाणें दवलतराव चांगले फसले म्हणावयाचे ! आपण शत्रूच्या फळींतून पार निसटून जात आहों, असेंच त्यांना वाटलें असेल ! आतिशहाण्याचा बैल रिकामा म्हणतात तशांतली दवलतरावाची अवस्था झाली. एव्हांना पश्चिमाखिंडींत राघोजीरावांनीं त्यांना गांठलें असेल नाहीं ?

**पहि० सर०**:—राघोजीरावांच्या सांपळ्यांत दवलतराव आयता जिवंत सांपडणार !

**पिला०**:—राघोजीरावांनीं हें काम चांगलें केलें ! राघोजीराव मोठे हुषार आहेत; पण सकाळीं यमुनेबरोबरच हंबीररावांनाहि कैद करून—

**दुस० सर०**:—त्यांत कांहीं त्यांची कसूर नाहीं. सरकारच्या छावणींतून सकाळीं जे हंबीरराव बाहेर पडले, ते स्वतःच्या डेऱ्याकडे गेलेच नाहींत ! वाटेंत एके ठिकाणीं त्यांचा शेला पडला होता, एका ठिकाणीं मंदिल सांपडला, स्वारी बहुतेक उघडीनागडीच चोहोंकडे भटकत असावी !

[ पडद्यांत " धांवा, पकडा सोडूं नका, आतां ही आमच्या हातीं लागलीच पाहिजे. " ]

**पिला०**:—हंबीररावांच्या सरदारांचा हा शब्द असावा. पाहूं बरें. ते पहा; पाहिलेंत, चेहरा नीट पहा. पुरुषाचें सोंग घेतलेली ही मोहना असावी ! चला, असे आपण वळसा घालून जाऊं आणि हंबीररावाच्या लोकांना मदत करूं.

[ पडद्यांत दुसऱ्या बाजूनें पुरुषवेशांत मोहना व तिचा पाठलाग करणारे हंबीररावाचे लोक येतात. ]

**मोह०**:—भेकड भित्र्यांनो, या असे पुढें या.

**हंबी० चे सर०**:—ह्या वेळीं मोहनेला हातची सोडूं नका. जाऊं या ह्याच बाजूला. सरलष्कर पिलाजी माग्यांच्या गोटांकडे आयती चालली आहे.

**मोह०**:—( स्वगत ) हे म्हणतात त्याप्रमाणें मी भलत्याच दिशेला चाललें आहे खास; नाहींतर एव्हांना तिकडचें सैन्य मला दिसायला पाहिजे होतें. हें स्तब्ध असे उभे कां राहिले ? मला जिवंत पकडण्याचा यांचा बेत दिसतो. ( उघड ) या; पुढें या; असे भित्र्यासारखे उभे कां राहतां ? रणभूमिवर उभी राहिल्यावर वीरपत्नी किती शूर होऊ शकते, पतिव्रता किती क्रूर देवता बनते, हें तुम्हांला चांगलें समजावून देतें.

[ पिलाजी व इतर हंबीररावाच्या लोकांना मिळतात.

**पिला०**:—असे दगडासारखे तुम्ही निश्चल कां ? हंबीररावांप्रमाणें तुमच्या-वरहि मोहनेनें आपला मंत्र टाकला कीं काय ? चला; अंगावर चाल करून जा; अभिमन्युला ज्याप्रमाणें व्यूहांत पकडलें, त्याप्रमाणें तुमच्या तलवारींच्या व भाल्यांच्या कैचींत हिला पकडा.

**मोह०**:—या, या, पुढें या; या भवानी तलवारीच्या धारेवर बळी पडून आपल्या पापाचें प्रायश्चित्त घ्यायला पुढें या.

**पिला०**:—पाहतां काय, बायकांच्या धमकावणीला तुम्ही भीक घालणार ?

[ हंबीररावांचे लोक तलवारी उपसून धांवून जातात. इतक्यांत
हंबीरराव प्रवेश करून मध्यें उभा राहतो. ]

**हंबी०**:—खबरदार ! तलवारीचें आणि भाल्याचें ह्या जगांत काय काम ? हें जग प्रेमाचें आहे, हें जग मोहनेचे आहे. मोहनेची तसबीर काढण्याकरतां ह्यावेशांत मोहनेला पाहण्याची जर तुमची इच्छा असेल, तर त्या तलवारी अगो-दर म्यानांत घाला, आणि मजप्रमाणें मोहनेचीं आर्जवें करा. मोहने—

**पिला०**:—त्यांना भ्रम झाला आहे, ह्या वेड्याचें—

**हंबी०**:— मी वेडा कीं तुम्ही वेडे ! मोहनेची दृष्टि त्या तुमच्या भाल्यांवर पडूं द्या, भाल्यांचीं टोकें बोथट होतील, तलवारीची धार नाहींशी होईल, तुमच्या हातांतील हीं निर्जीव हत्यारें मोहनेच्या प्रेमानें आपला तीक्ष्ण क्रूरपणा टाकून देऊन तुमच्या सजीव देहांना प्रेमाच्या जादूचें सुख कसलें असतें तें शिकवतील. मोहने, तलवार हातांत धरण्याचें श्रम तुला कशाला ?



हंबी०——खबरदार! तलवारीचें आणि भाल्याचें ह्या जगांत काय काम? [ पृ० ७२

**मोह०:**—( स्वगत ) ह्या संधीला आपण पळ काढून तिकडच्या सैन्याला गाठावें हें बरें.

[ मोहना जाऊं लागते. पिलाजी इतर सरदारांना खुणावून मोहनेच्या मागून जाऊं लागतो. ]

**हंबी०:**—मोहने, जाऊं नको, जाऊं नको. तूं भिऊं नको. हे वेडे पहा आपोआप लपतछपत जाऊं लागले—

**मोह०:**—प्रतापरावांचें सैन्य त्या जवळच्या टेंकडीजवळ येत आहे; त्याला जाऊन मिळावें म्हणजे ह्या वेड्याचा त्रास चुकला.

[ जाते; पिलाजी वगैरे जातात.

**हंबी०:**—मोहने, मोहने.—अरे ही निघून देखील गेली! तिनें जादूनें तर मला भारून टाकिलें नाहीं ना? माझे पाय का जागा सोडीत नाहींत? मी कां अजून तिच्या मागें लागून जात नाहीं? मी खुळा तर नाहीं ना? मी वेडा कां बरें झालों! परमेश्वरानें जर घरोघर मोहनाच मोहना उत्पन्न केल्या असत्या—चांगल्या सुंदर वस्तूंची लयलूट जगांत कां असूं नये? मी खात्रीनें वेडा नाहीं. मोहनेचा नाद ज्या पुरुषांना लागावयाचा नाहीं तेच वेडे, तेच खुळे, पावलांनो, मोहनेकडे मला वाहून नेण्याची जर तुमच्यांत शक्ति नसेल, व तुम्हीहि माझ्याप्रमाणें मूर्ख बनलां असाल, मोहना जेथें जेथें आपलें पाऊल टाकीत गेली असेल, तेवढ्याच त्या जागेवर जाऊन पडा, म्हणजे तुमच्यांत उत्साह, धैर्य येईल.

[ जातो. पिलाजी व त्याचे सरदार येतात.

**पिला०:**—ह्या लोकांच्या हातांत मोहना आतां कसची सांपडते! ती गेली पार निघून! बरें, तुम्ही असें करा, त्या हंबीऱ्याला फसवून कैद करा. अगोदरच हंबीररावाचें सैन्य नाउमेदीनें लढत आहे, आणि तशांत हा जर पुढें आतांच्यासारखें वेडेंविद्रें कांहीं बरळला तर सर्वच पारडें उलट करावयाचें!

**पहि० सर०:**—ह्या कारणानेंच प्रतापरावांचे सैन्य इतकें पुढें चालून आलें, आणि त्यानें ही जवळची टेंकडी व तीवरील आमच्या तोफा काबीज केल्या.

**पिला०**—प्रताप्याची मला फिकीर नाहीं. खानाच्या खुनामुळें चिडलेले अरब, रोहिले, आतां त्याच्यावर सोडतों व घटके दोन घटकेंत ह्या लढाईची समाप्ति करतों. ( पहिल्यास ) तुम्ही हंबीररावांस पकडण्याच्या उद्योगाला जा. ( दुसऱ्यास ) तुम्ही फेजलला जाऊन माझा हुकूम कळवा कीं, खानाच्या खुनाचा सूड घेण्याची वेळ आतां आली आहे. [ सरदार जातात.

**पिला०:**—त्या हंबीऱ्याला जिवंत धरलाच पाहिजे. यमुनेला तर राघोजीरावानें धरून आपल्याबरोबर नेलीच. [ जासूद येतो.

**जासू०:**—सरदारसाहेब, पश्चिम खिंडींतून राघोजीरावाकडचें दुःखाचें वर्तमान घेऊन मीं आलों आहे. सूर्याजीराव मोहिते, प्रतापरावांचे श्वशुर, पंधरा हजार पोक्त सरंजामानिशीं कांचनगडास मदत करण्यास आले आहेत. राघोजीरावांनीं असें सांगितलें आहे कीं, कसेंहि करून घटका दोन घटका सूर्याजीरावांना मी पुढें येऊं देत नाहीं; तोंपर्यंतच दोनतीन हजार अरबांची कुमक पाठवून द्यावी.

**पिला०:**—जा; लवकर जाऊन त्यांना सांग, मोहित्यांना पुढें येऊं देऊं नका. कुमक आलीच म्हणून समजा. ( जासूद जातो. ) आतां मात्र माझ्या नशिबानें उलट खाल्लीशीं दिसते. हरकत नाहीं; नशिबा, तुला सावरून धरायला हा पिलाजीराव खंबीर आहे. राघोजीराव त्या पश्चिम खिंडींत खुशाल मरूं दे; ह्या वेळीं माझ्या हाताखालच्या सर्व सैन्याचा मारा मी प्रतापरावावर करणार. मोहित्यांचें पंधरा हजार सैन्य दाखल होण्याचेपूर्वीं येथला कारभार आटपतों. हंबीऱ्याला कैद करून प्रतापरावांचें शीर हातांत घेऊन माझे निवडक घोडे विजापूराकडे निघून गेल्यावर, आपल्या जावयांच्या नांवानें ऊर बडवून घ्यायला सूर्याजीराव मोहित्यांना कांचनगडच्या मैदानावर खुशाल येऊं द्या. [ पडदा.

---

## प्रवेश दुसरा.

**स्थळ**—रणभूमि.

[ प्रतापराव, संताजीराव, सैन्यासह प्रवेश करतात. ]

**प्रता०:**—एकूण, दवलतराव शत्रूचा व्यूह फोडून पार गेले म्हणायचे ! शत्रूला जिंकून दवलतराव पार गेले, कांचनगडचें नांव राहिलें. ते पुन्हां नवीन सेना उभी करतील आणि पादशाही बुडविण्याच्या प्रयत्नाला लागतील. संताजीराव, तुम्ही आतां तलवार चांगली गाजविली !

**संता०:**—आम्ही या टेंकडीवर चढण्याबरोबर शत्रूच्या सैन्यांत पहा कशी एकच धांदल उडाली आहे ! हें आमचें सैन्य ह्या टेंकडीकडे येत आहे तर

त्याला कोणी अडथळाहि करीत नाहीं. हंबीररावाच्या लोकांनीं जशी मघाशीं हालचाल केली नाहीं, त्याप्रमाणेंच मान्यांचेहि लोक आतां उगीच उभे आहेत. मोठेंच आश्चर्य !

**प्रता०**:—अहो, आम्हांला मुद्दाम म्हणून एके ठिकाणीं गोळा होऊं देत आहेत. त्यांच्या मनांत आमच्यांपैकीं कोणीहि जिवंत राहूं नये असें असावेंसें दिसतें.

**संता०**:—पण ह्या टेंकडीवर जर सर्व आम्ही गोळा झालों, तर शत्रूला जाचणार नाहीं का ?

**प्रता०**:—संताजीराव, आमच्या चौपट पांचपट शत्रूचें सैन्य आहे. चार-पांच हजार काटक अरब, रोहिले आहेत, किती तरी तोफा आहेत. ही भिकार टेंकटी आमचें किती वेळ रक्षण करणार ! संताजीराव, आज मरण हें सर्वांच्या कपाळीं लिहिलेंच आहे, पण शत्रूचा पक्का सूड उगविण्याचा सर्वांनीं निश्चय केला पाहिजे. संताजीराव, आमची मान तुटेल, आमचीं हाडें चिंबून चिंबून जाऊन त्यांचा चुराडा होईल, पण संकटांना केंसभरहि आम्ही हार जाणार नाहीं, हें शत्रूला आज पक्कें समजूं द्या. म्हणजे आम्ही जिवंत राहून जें कार्य आमच्या हातून पार पडणें अशक्य आहे, तें काम आमच्या मरणानें आपोआप होईल, आमचा काटकपणा, आमचें शौर्य, शरीरांत जिवाची धुगधुगी असे तों आमची लढण्याची हौस, हीं विजापूरच्या पादशहाला कळूं द्या, लाखों फौजेनें विजा-पुरास गराडा दिला असतां पादशहास जी भीति वाटेल, त्याहून अधिक भीतीनें आमचें नांव निघण्याबरोबर पादशहा कांपूं लागेल ! विजयानगराकरितां आम्हीं किती हाल सोसले, धर्मासाठीं आम्हीं आपले प्राण कसे खर्चीं घातले, ह्याची हकीकत तुमच्या देशांत चोहोंकडे पसरूं द्या, तुमच्या प्रत्येक खेड्यांत दवलत-रावासारखे—संताजीरावांसारखे—सेनानायक जन्मास येतील, आणि प्रत्येक झोंपडींत ह्या माझ्या सेनेसारखे प्राणास प्राण देणारे शूर वीर निपजतील. तुमच्या देशभक्तीचें, तुमच्या धर्मनिष्ठेचें, शत्रुविषयींच्या अस्सल सूडांचें बीज तुम्ही आज ह्या भूमींत आपल्या मरणानें पेरीत आहां. वीरहो, तुम्ही आज मरायला जात नाहीं, तर एकाचें हजार—लाख होऊन, तुमच्या शत्रूचा बींमोड करण्या-करितां जात आहां.

**संता०**:—प्रतापराव, आपण ह्या ठिकाणी उभे राहून पहा, शत्रूच्या अंगावर आम्ही कसें तुटून पडतों तें ! ह्या दुसऱ्या तुकडीच्या लोकांनीं टेंकडी गांठली. ही पहा !—

**प्रता०:**—संताजीराव, त्यांना व आपल्या जवानांना टेंकडीच्या निरनिराळ्या भागीं नीट उभे करा, आणि शेवटची माझी इच्छा काय आहे तें सर्वांना कळवा. ( संताजीराव व लोक जातात. ) असले एकनिष्ठ शूर नोकर मिळणें म्हणजे मोटें भाग्यच समजलें पाहिजे. परमेश्वरा, आज आमची सर्वांची कत्तल झाल्यावर माझ्या या शूर, प्रामाणिक, पुण्यवान् सेनेला ज्या ठिकाणीं जन्मास घालशील त्याच ठिकाणीं ह्या अभागी, दुर्दैवी प्राण्यालाहि पुन्हां जन्माला घाल, अशी माझी मरणापूर्वीची तुला प्रार्थना आहे. माझ्या पदरीं जर कांहीं पुण्य असेल तर त्याबद्दल मला स्वर्गसुख नको, नंदनवनांतील सुखोपभोग मला नकोत; पादशहाचे जाचांतून विजयानगरास मुक्त करण्याचें कामीं माझें सर्व पुण्य खर्च होऊं दे. पुढील जन्मीं पुढारी सरदार होण्याइतकें जर माझें पुण्य नसेल, तर मराठ्यांचें जें सैन्य विजापूरची राखरांगोळी करील, त्या सैन्यांतल्या अतिशय क्षुल्लक दर्जाच्या नोकराचे जन्माला, मला देवा, घाल. परमेश्वरा, मनुष्यकोटींत पुन्हां जन्मास घालण्याची जर माझी योग्यता नसेल, तर ज्या घोड्यावर स्वार होऊन मराठे विजापूरचा दरवाजा फोडतील, त्या घोड्याच्या तरी जन्माला मला जाऊं दे. हा मानहि पुढील जन्मीं जर मला मिळावयाचा नसेल, तर विजापुरावरील मराठ्यांच्या स्वारीची सामुग्री वाहून नेणारा बैल तरी निदान मला कर. देवा, माझा देश स्वतंत्र करण्याचे कामीं मीं कधींहि, केव्हांहि, कसाहि उपयोगीं पडूं नये, इतकें जर माझें पाप असेल,—पिशाच्चयोनींत जाऊन पापाबद्दल यातना सोसण्याचें जर माझ्या फुटक्या नशिबीं लिहिलें असेल, तर मराठ्यांनीं विजापूरचा विध्वंस केल्यावर, त्या जागीं उगवणाऱ्या निवडुंगांतून पिशाच्चरूपानें निदान फिरण्याची मला परवानगी असूं दे. [ पडदा.

---

## प्रवेश तिसरा.



**स्थळ**—कांचनगडाच्या मैदानावरची टेंकटी.

[ दोन गोलंदाज येतात. ]

**पहि०:**—ह्या अरबांच्या पुढें व रोहिल्यांच्या पुढें आमच्या लोकांचा टिकाव फार वेळ लागेलसें वाटत नाहीं. अरे, ही पहा एक टोळी आपल्या तोफेच्या

माऱ्यांत आली, दे तोफेला एकदम सरबत्ती. ( तोफेचा आवाज. ) इतका वेळ तोफ बंद ठेवण्याचें कांहीं तरी सार्थक होऊं दे.

**दुस०:**—असलें मातबर युद्ध मीं कधींहि पाहिलें नव्हतें. महाराजांनीं आज काय कत्तल करण्याचा सपाटा लाविला आहे ! प्रतापरावासारखा वीर, सर्व दुनियेंत नाहीं म्हणतात, तें अगदीं खरें आहे.

**पहि०:**—सरकारच्या शेजारीं, त्या पहा, वहिनीसाहेब लढत आहेत. मघाशीं त्या आमच्या तुकडीला येऊन मिळाल्या. त्यांना तूं पाहिलें नाहींस ?

**दुस०:**—नाहीं, मीं पाहिलें नाहीं. हां, दिसल्या ! अरे, धनीसाहेब ज्या बाजूला गेले त्याच बाजूला सर्व अरब लोक गोळा झाले अं ! छे, त्यांनीं फार नेटानें हल्ल्याचें काम सुरू केलें आहे. तो पहा फेजल रागानें प्रतापरावांच्या अंगावर चाल करीत आहे. दुष्टानें घात केला, धनीसाहेबांच्या अंगावर चांडाळानें मारली तलवार.

**पहि०:**—शाबास ! वहिनीसाहेब, शाबास ! धन्य ! वीरपत्नी, धन्य ! ऐन वेळेला फेजलच्या हातावर त्यांनीं वार केला पहा ! भली खोड मोडली चोराची. तें पहा, सरकारस्वारीनें त्याचें शीर उडविलें आपल्या तलवारीनें ! जयघोष करा, दे तोफेला सरबत्ती ! [ तोफेचा आवाज.

**दुस०:**—अरेरे ! हें फार वाईट झालें. सरकार व वहिनीसाहेब अरबांच्या अंगावर चाल करून फार पुढें गेलीं ! अरेरे, अरबांचा त्यांच्या सभोंवतीं गराडा पडला. झाला घात झाला ! कितीजणांनीं तरी त्यांच्यावर तरवारी उगारल्या ह्या ! किती भाले त्यांच्यावर रोंखलेले हे ! पडले लढाईत पडले; कांचनगडाचा सूर्य मावळला; झाली, अवताराची समाप्ति झाली ! धनीसाहेब—महाराज—वीरहो, अरब त्यांना नेऊं पहात आहेत, नेऊं तरी देऊं नका. संताजीराव असाच हल्ला नेटानें करा, म्हणजे आमचे सरकार, आमच्या वहिनीसाहेब, आमच्या हातीं तरी लागतील. शाबास ! संताजीरावांनीं दोघांनाहि उचलून अलीकडे घेतलें हें एक बरें झालें.

**पहि०:**—अरे, हा काय चमत्कार पाहिलास का ? पिलाजी माऱ्यांच्या स्वारांनीं पळ काढिला; त्यांचें सैन्य मागें परतलें ! अरबांच्या, तोंडचें पाणि पळालें ! त्यांची कोण धांदल उडाली पहा ! काय बरें कारण ?

**दुस०:**—हीं पहा हीं दोन्ही बाजूंनीं दोन मोठीं सैन्यें ह्या जवळच्या टेंकडीच्या

आहून आमच्या अगदीं जवळ आलीं आहेत. उजव्या हातच्या सैन्यांत तर है दवलतरावांचें निशाण आहे.

**पहि०**:—हें पहा डाव्या हातच्या ह्या सैन्यानें पिलाजी मान्यांच्या स्वारांन गांठलेंच ! दोन्हीं सैन्यें आमच्याजवळ येऊन ठेपलीं. दवलतरावांनीं एवढें मोठें सैन्य आणलें कोठचें ! डाव्या हातचें कोणाचें हें निशाण ?

**दुस०**:—हें सूर्याजीराव मोहित्यांचें निशाण. मीं ओळखलें; हा आमच्या सैन्याचा जय झाला ! धनीसाहेबांना घेऊन संताजीराव आलेच. परमेश्वरा, त्यांना मोठी जखम झालेली नसूं दे ! [ जातात.

---

## प्रवेश चवथा.

[ संताजीराव, प्रतापराव, मोहना व इतर सरदार. ]

**संता०**:—( प्रतापरावाजवळ बसून ) धनीसाहेब, सरकार, महाराज, शत्रूच्या अंगावर इतक्या आवेशानें स्वतः चालून जाण्याचें काय कारण होतें ? आम्ही काय नोकर कोणी नव्हतों काय ? वहिनीसाहेब, इतक्या जखमा अंगावर घेण्याचें काय कारण ? या संताजीरावावर सर्व लढाई सोंपवावयाची होती. महाराज, एक शब्द तरी मजशीं बोला.

**प्रता०**:—( सावध होऊन ) लढाई—

**संता०**:—बोलण्याची देखील शक्ति उरली नाहीं ! महाराज, सर्व जखम बांधून झाल्यावर बोलावें.

**प्रता०**:—लढाईचें काय झालें ?

**संता०**:—महाराज, दवलतराव व सूर्याजीराव मोहिते पंधरा हजार फौज घेऊन आले, आमची फत्ते झाली सरकार.

**प्रता०**:—आतां आनंदानें मरतों. दवलतराव कोठें आहेत ? सूर्याजीराव कोठें आहेत ? हें कोण शेजारीं जवळ आहे ? माझ्या शेजारीं लढत होती ती माझी लाडकी मोहना ना ?

**संता०**:—होय महाराज, वहिनीसाहेबच ह्या.

**प्रता०**:—माझ्यानें हालवत नाहीं. मला तिच्याजवळ न्या. मोहने, माझ्या